राष्ट्रीय जीवनचरित्र माला

# नरसी मेहता

के. का. शास्त्री

अनुवाद

सौ. आशा खोत.



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# अनुक्रमणिका

# जीवन चरित्र

गुजराथच्या सौराष्ट्र विभागांतील भावनगर जिल्हाच्या पहाडावर बौद्धकालीन गुहा आहेत. त्या गुहांमुळेच ओळखल्या जाणाऱ्या तळाजा गांवी 'नरसी' चा जन्म झाला. त्यांच्या 'मामेरू' नावाच्या आत्मचरित्रपर काव्यांत तळाजा गांवी माझा जन्म झाला असा उल्लेख आहे. त्याकाळी नरसिंहाचे मातृकुल किंवा पितृकुल या गावांत राहत असावे, यावरून एक गोष्ट सिद्ध होते की नरसी मेहतांच्या जातीतील एकादा छोटा मोठा समुह तळाजा गावीं आणि त्याच्या आसपासच्या प्रदेशांत राहत होता. नरसिंहच त्यांच्या 'मामेरू' काव्यांत नागर कुटुंबी निर्धन जन्मलों या शब्दात स्वतःला नागर ब्राह्मण म्हणत आहेत. यावरून तळाजा गावांत नागर वस्ती जुन्या काळापासून असावी हेही लक्षात घेण्यासारखे आहे. तळाजा (किंवा तालध्वजनगर) इ.स. च्या १३ व्या शतकारंभी महास्थान (मोठे शहर) म्हणून प्रसिद्ध होते. वि.स. १२६४ (इ.स. १२०७) मध्यें शेत्रुंजी नदीच्या खोऱ्याचा प्रदेश सोलंकी राजा भीमदेव बीजाच्या सत्तेखाली होता. या प्रदेशावर त्याचा मांडलिक (दर्जाचा) महेर राजा जगमल राज्य करीत होता. तळाजामहास्थानात त्याने भगवान श्री चौडेश्र्वर आणि श्री पृथ्वीश्वर (महादेव) यांची मंदिरे बांधली. त्या काळी तिथे जैनांची धर्मस्थाने पण होती. त्याहुनही जुन्या काळांत तिथे बौद्धांची चांगल्यापैकी वस्ती होती. ही गोष्ट, पर्वतांवरील त्यांच्या गुहावरून स्पष्ट होते. वल्लभनगरच्या मैत्रकांच्या ताम्रदानशासनाच्या आधारे असे म्हणता येईल कीं इ.स. ४५० पासून साधारण पणे इ.स. ७६६ पर्यंत वल्लभीराजे राज्यावर होते. तोंपर्यंत त्यांनी बौद्धधर्माला चांगले उत्तेजन दिले. ब्राह्मण धर्मालाही त्यांचे उल्लेखनीय उत्तेजन होते, त्यांनी आनंदपूर वास्तव्य, आनंदपूरविनिर्गत, आनर्तपूरवास्तव्य आणि आनर्तपूर विनिर्गत ब्राह्मणांना अगणित दाने दिली होती. आनंदपूर आणि आनर्तपूर ही नावे उत्तर गुजराथच्या 'वडनगर' ची पर्यायी नावे आहेत. वडनगर हें नागर लोकांचे जुने स्थान आहे. मैत्रक राजानी (वल्लभी राजे) आनंदपूर तसेच आनर्तपुरचे रहिवासी, आणि तेथून सौराष्ट्रांत गेलेल्या लोकांनाही दाने दिली. अशाप्रकारे सौराष्ट्रात गेलेल्या ब्राह्मणाना उपजिवीकेचे साधन उपलब्ध करून दिले. त्यामुळे वडनागर किंवा नगरचे निवासी

नागर सौराष्ट्रांत ब्राह्मण म्हणून स्थायी झाले. त्यातलेही काही वल्लभीनगराच्या आसपासच्या प्रदेशांत आले होते. नरसिंह महेताच्या पितृवंशातले अगर मातृवंशातले कोणते पूर्वज गोहिलवाड्यात किंवा थेट तळाजांत येऊन राहिले, ते नक्की करायला आपल्याशी कोणतेच साधन नाही; परंतु थेट ५ व्या शतकापासून त्यांचे वास्तव्य सुरू होऊन गेले होते. याला मात्र इतिहासाचा सबळ आधार आहे.

नागर (ब्राह्मणांत) लोकांत वडनागरा, वीसनगरा, साठोदरा चितरोडा, कृष्णोरा आणि प्रश्नोरा असे भेद केव्हां पडले हे सांगणे कठीण आहे, तरीपण जो समूह वडनागरांत स्थिरपणे राहिला तो 'वडनागरा' म्हणून प्रसिद्ध आहे. काहीना काही कारणांमुळे काहीं काहीं कुटुंबे ज्या ज्या गावांत स्थायिक झाली, त्या त्या गांवाच्या संबंधामुळे त्याना पोटजातीचे नागर (ब्राह्मण) म्हणून ओळखले जाऊ लागले. सहाजिक त्यांचे नामभेद झाले. नरसिंहांच्या पुत्राचा विवाह वडनागरच्या मदन महेतांच्या मुलीशी झाला होता. परवत महेता नरसिंहाचे काका. अजुनही वैष्णव अवटंक म्हणून ओळखले जाणारे. पर्वतरायांचे वंशज, वडनागरा नागर म्हणून ओळखले जात आहेत. यावरून नरसी महेता वडनागरा नागर होते हे स्पष्ट आहे. यांच्या उपलब्ध वंशावळीवरून यांच्या आजोबांचे नाव पुरूषोत्तम पंड्या. वडिलांचे नाव कृष्णदास आणि काकाचे नाव पर्वतदास होते. या वंशावळीनुसार जीवनराम आणि नरभेराम हे नरसिंहाचे मोठे भाऊ होते. जुनागडपासून साधारण ६४ कि.मी. नैऋत्येला समुद्रतटावरील नांगरोळ (सोरट) गांवी पर्वतदास काकांचा बराचसा जीवनकाळ गेला. त्या काळी तिथे नागरलोकांची लहानशी वसाहत होती. पर्वतदासांचे जीवन कशा तऱ्हेचे होते हे सांगणे शक्य नाही. वृद्धावस्थेंत हे एक मोठे भक्त होते. वृद्धावस्थेमुळें जेव्हा त्याना द्वारकेला जाणे अशक्य झाले, तेव्हां त्यांच्याकडे रणछोडरायां दशांगुल स्वरूप प्रगट झाले, असा उल्लेख 'पर्वतपचीसा' या काव्यात आहे. हे काव्य पर्वतदासांचे वंशज गायकवाडी मजमुदार आणि नामांकित भक्तकवी त्रिकमदास भवानीशंकर, यांनी लिहिले आहे. नरसिंहांचे वडील कुठे राहात होते हे सप्रमाण सिद्ध करणे अशक्य आहे. नरसिंहाचे एक वडील बंधू तळाजा गावी. राहत असत, त्यांचे वडीलही कदाचित तळाजालाच, पुत्रसमवेत राहत, असे अनुमान काढणे शक्य आहे. तळाजात जन्मलेल्या नरसिंहाचा इतिहास तळाजांतच सुरू झाला. त्याची जन्मवेळ आणि वर्ष, दोहींची कुठेही नोंद नाही. नरसिंहाच्या आत्मचरित्रपर रचनांमधे, निरनिराळ्या प्रसंगाबाबत महिना, पंधरवडा, तिथी, वार यांची नोंद आहे. मात्र एक रचना सोडून बाकी कुठेही (वर्षाची) साल नोंद नाही. 'हारसमें' च्या शेवटच्या पदांत वि.स.१५१२ च्या सालाची नोंद आहे. हे तितकेच खरे, 'हारमाळाच्या' संकलीत केलेल्या छोट्यामोठ्या पदांत वार आणि महिने संगतवार आढळत नाहीत. तरीपण 'हारसमा' च्या एका गीतांत मृगनक्षत्र मावळल्याचा निर्देश

आहे. म्हणूनच वि.स.१५१२, मार्गशिर्ष शुद्ध सप्तमी आणि रविवार (१५-११-१४५५) हा दिवस (काव्यांचा काळ म्हणून) नक्की होऊं शकतो. 'हारसमे' च्या पदांत मुलीला द्यायचे मामाकडचे आंदण परमेश्र्वरांनेच दिले, आणि मुलाच्या विवाहपदांत मामेरू/ पुढे पुरें करायचे आहे असा निर्देश आहे विवाह, मामेरू आणि हार हे तीन प्रसंग नरसिंहाचे जन्मवर्ष नक्की करण्यात मदत करतात..नरसिंहाच्या मुलाचा लग्नाचा दिवस, वैशाख शुद्ध पंचमी, गुरुवार, आहे. महिना, पंधरवडा तिथी आणि वार, यांच्या उल्लेखांवरून, गणितदृष्ट्या हे वर्ष वि. स.१४९४ म्हणजे ता. ७-४-१४४० तंतोतंत बरोबर ठरते. मुलगा लग्नात १२ वर्षाचा होता, म्हणजे त्याचा जन्म वि.स. १४८४ (इ.स.१४२८) चा असला पाहिजे. नरसिंहाचा गृहत्यागाचा दिवस चैत्र शुद्ध सप्तमी सोमवार, म्हटला आहे. तिथी दृष्ट्या हे वर्ष वि.स.१४८४ (२३-३-१४२८) ठरते. नरसिंहाच्या संतांनांमध्यें मुलगा मोठा की मुलगी हे सांगणे कठीण आहे. विवाहानिमित्त केलेल्या पदरचनांमध्ये मुलाचा निर्देश प्रथम आहे. पुत्रजन्माच्या वेळी नरसिंहाचे वय १८ वर्षे स्वीकारले तर त्यांचे जन्मवर्ष वि.स. १४६६ (इ.स.१४१०) ठरते. हे अनुमान, आजवर स्वीकारलेल्या त्यांच्या जन्मवर्षाच्या (वि.स.१४६९) आसपासचेच आहे. शिवाय त्यांच्या आत्मचरित्रपर पदांत दर्शविलेल्या काळाच्या संदर्भात निश्र्चितपणा देणारे आहे.

नरसिंहाच्या जीवनतील बदल घडवून आणणारा प्रथम प्रसंग गृहत्याग आणि शंकराची आराधना होय. लग्न होऊन्न गेले होते. आणि भाऊ भावजयी समवेत काळ चालला होता. त्यांच्यावर जबाबदारी पडू नये म्हणून नरसिंह काहीतरी कामधंदा करीत होतेच. एके दिवशी संध्याकाळी दिवसभर करून थकून भागून नरसिंह घरी आले. भावजयी त्यांनी पाणी मागितले. भावजयीने पाणी तर दिले नाहीच, उलट मनाला लागतील असे, खोचक बोचक टोमणे मारले. नरसिंहाना हे सारे खोल जखमेप्रमाणे बोचले. त्यांच्या मनात आले, सावत्र आईच्या कटू बोलण्यामुळे ध्रुवबाळ वनात निघून गेला. तपश्र्चर्या करून त्याने सिध्दी प्राप्त केल्या - मी पण हे घर सोडून जायला हवे - नरसिंहाना चीड आली. गृहत्याग करून ते अरण्यातल्या एका उजाड शिवालयांत पोचले. सात दिवस उपाशी राहून त्यांनी घोर तपश्र्चर्या केली. आपल्या काव्यमय वाणीत ते म्हणतात. "त्यानुसार सात दिवसानंतर भगवान शंकर प्रसन्न झाले. नरसिंहाना 'वर' मागायला सांगितल्यावर आपल्याला जे प्रिय तेच मला वरदान द्या" असे नरसिंह म्हणाले.

शंकरानी नरसिंहाना आपल्याबरोबर द्वारकेला नेले आणि भगवान श्रीकृष्णाच्या रासलीलेचा साक्षात्कार घडवला. 'हारमाळा' च्या गीतांत स्वप्नांत येऊन्न गेलेल्या महादेवानी वरदान मागायला सांगितले ' असे नरसिंह म्हणतात. 'विवाह' काव्यांत नरसिंह ३ महिने द्वारकेंत राहिले आणि काव्यरचना करण्याचा, श्रीकृष्णानी कृपापूर्ण आशिर्वाद दिल्याचा निर्देश

आहे. नरसिंह असेंही म्हणतात कीं श्रीकृष्णानी त्याच्या हातांत एक फूल ठेवले 'साचु सुपन मे दृष्ट देख्युं' (सत्य स्वप्न मी स्पष्ट पाहिले) असा निर्वाळा नरसिंह देतात. भगवान शंकराचे वरदान आणि श्रीकृष्णांची कृपा प्राप्त करून तळाजा गांवीं गेले आणि भाऊ-भावजयीला भेटले. भाऊभावजयीकडून त्याना थोडा मान मिळाला. आता त्यांच्याकडे गावागावांतून आणि दूरदूरच्या ठिकाणांहूनही संतमंडळी आणि भक्तमंडळी येऊं लागली होती. अशा परिस्थितींत भाऊ भावजयीवर भार टाकणे, नरसिंहाना योग्य वाटले नाही. जुनागडला, नागरांच्या वस्तीत एक छोटेसे घर भाड्याने घेऊन नरसिंह पत्नीसह राहू लागले. तिथेच पुत्र सामळदासाचा जन्म झाला, आणि पुढील वर्षीच कन्या कुंवरबाई जन्माला आली.

पुत्राचे लग्न वि.स. १४९६ (इ.स.१४४०) मधें झाले. तोंपर्यंतची १२ वर्षे नरसिंहानी काही कामधंदा करून काढली की फक्त भजनकीर्तनांत घालवली हे खात्रीपूर्वक सांगायला काही पुरावा नाही. अशी शक्यता वाटते, की उदरनिर्वाहासाठी अर्थार्जन करीत असतांनाच भजनकीर्तनांत आणि नवीननवीन पद्यरचना करीत ते आपला काळ घालवीत असावेत. या १२ वर्षांच्या कळात नरसिंह नागर ब्राह्मणांच्या टीका टिंगलीचे विषय बनले होते. नरसिंहाच्या 'विवाह' काव्यांत हे स्पष्ट करणारी एक घटना आहे. मदन महेतांचे दिक्षित गोरमदन वडनगरहून मदन महेतांच्या 'रतन' नावाच्या मुलीसाठी वरसंशोधनार्थ जुनागडला आले. त्यांना कोणताच सुयोग्य मुलगा, जातिबांधवात आढळला नाही. निराश होऊन ते परत जात असतां टिंगलखोर नागरांनी गोरमदन दीक्षिताना नरसिंहाचे घर दाखविले. नरसिंह टीकाटिंगलीचे विषय कां झाले, याचे नीटसें स्पष्टीकरण नरसिंहानी, दिलेले नाही. मात्र नरसिंहाची छाप असलेल्या एका पदांत एका घटनेचा उल्लेख आहे. गिरनारच्या पायथ्याशी असलेल्या 'दामोदर' कुंडांत स्नान करण्याचा, नरसिंहाचा परिपाठ होता. तिथे एकदां ,अस्पृश्य जातीच्या एका नामांकित भक्तांने नरसिंहाचे चरण धरले. त्याने विनंती केली 'आमच्या अंगणात आपण कीर्तन करावे.' नरसिंहाला त्या हरिभक्ताची करुणा आली. त्यांनी सांगितलें, जमीन गोमुत्राने स्वच्छ करा, आणि तुळशीचे रोप लावून ठेवा. रात्री नरसिंह तिथे गेले. रात्रभर तिथें त्यानीं उत्सव आणि भजनकीर्तन केले. बरोबर नेलेला भगवत् प्रसाद सर्वांना वाटला. पहाटे नरसिह ईश्र्वर भजन करीत जेव्हा आले, तेव्हा नागरब्राह्मण, टाळ्यांच्या तालांत 'ब्राह्मण पुत्राच्या भगवत् वेडाची' मस्करी करूं लागले. नरसिंहांनी मुकपणे सारे सहन केले. सकाळी लोक जागे झाले. त्यांना पण नरसिंहांच्या विवेकहीन - म्हणजे ब्राह्मणाने अस्पृश्यांच्या घरी जाणे, अशा वर्तनाचा तिरस्कार वाटला. नरसिंहानी ' जिथे वैष्णव, तिथे मी' अशा शब्दांत आपल्या वर्तनाची तरफदारी केली. आपल्या वर्तनाला 'वैष्णव' हाच आधार त्यांनी घेतला. हे अनुसंधान घेऊन त्यांनी खालील पद रचले.' एवा रे अमो एवा रे एवा, तमे कहो छो वली तेवा रे- भक्ति करतां जो भ्रष्ट कहशो तो करशुं

दामोदरनी सेवा रे " ( असे रे, असे रे, असे रे आम्ही तुम्ही म्हणता चला तसेच आम्ही , भक्ती करतो. तर भ्रष्ट म्हणता तर आतां दामोदरची सेवा करू.)

**सघळा साथमां हुं एक भुंडो, भुंडाथी वली भुंडो**
**तमारे मन माने ते कहेजो, स्नेह लाग्यो छे मने उंडो.**

(सर्वांमध्ये मीच एक खराब - खराब पेक्षांही खराब हो. तुम्हाला वाटते, ते तुम्ही म्हणा- मला ईश्वराचे अगाध प्रेम वाटते)

**हळ्वां कर्मना टुँ नरसैंयो, मुझने तो वैष्णव वहाला,**
**हरिजनथी जे अंतर गणशे, नेनां फोगट फेरा डाला.**

(हलकी कर्मे करणारा मी नरसिंह, मला 'वैष्णव' प्रिय आहे, हरीजनांपासून स्वतः ला भिन्न मानणाराचा हा जन्मफेरा फुकट जातो) . नरसिंह महेता कृत काव्य इ.स.१४७१ या काळात अस्पृश्य-पण जो वैष्णव आहे, त्याच्या बाबतींत, जातीची भेदरेषा आखायला नरसिंहांचा स्पष्ट नकार आहे. ते भक्तिमार्गाच्या (भागवत मार्ग) उदात्त तत्त्वांना उचलून धरीत आहेत. महात्मा गांधींनी दलित वर्गाला व्यापक अर्थी, जे हरिजन म्हणून संबोधले, त्याच्या मुळाशी, नरसिंहानी वापरलेला 'हरिजन' हा शब्द कारणीभूत आहे.

नागरजात, पुरातन काळापासून आचारशुद्धिसाठी प्रसिद्ध आहे. आचारप्रणालीबद्दल, नरसिंहाचा उदार दृष्टिकोन त्याना न रुचणे तसे स्वाभाविक वाटतें; म्हणूनच जातीबांधवांना नरसिंहांचा तिरस्कार वाटत होता.

नरसिंहांच्या शब्दांतच, नागर जातीची, त्यांच्या बाबतींतल्या व्यंगात्मक वृत्तीची ओळख पटते. आपली वैष्णव भक्तांची भूमिका, निर्भयपणे, जराही उणेपणा न आणतां नरसिंहानी निभावली. भगवंतावर त्यांची पूर्ण श्रध्दा होती. ईश्वर भक्तांची संकटे निवारतो, असा यांचा दृढ विश्वास होता. या अनुसंधानांतच त्यांनी पुत्राचा लग्नप्रसंग निरूपला आहे. १३ दिवसांची मजल मारून वऱ्हाडी मंडळी जुनागडहून उत्तर गुजराथच्या वडनगरात येते. त्या काळात उत्तर आणि मध्य गुजराथवर मुसलमान सुलतानांची सत्ता होती. इ.स.१४४० साली सामळदासांचे लग्न झाले हे निश्चित मानल्यास, अहमदशहा पहिला, इ.स.१४११ ते १४४२ पर्यंत सत्तेवर होता. आजोबा मुझफरशहानंतर, अहमदशहा राज्यावर आला होता. इ.स. १४१४ मधे, साबरमतीच्या पूर्व किनाऱ्यावर, असावल आणि कर्णावती नजिक, अहमदाबादमधे, त्याने नवी राजधानी वसवली आणि गुजराथमधे, मुस्लिम सत्ता स्थीर केली. नरसिंहानी मदन महेतांचा संक्षिप्त परिचय दिला आहे, त्यावरून ते अहमदशहांचे 'वडनगर' पुरते हकीम होते असें दिसते. विचार केला कीं खरच वाटते; केवळ नरसिंहाच्या दृढ ईश्वरभक्तीच्या प्रभावामुळेच लग्नकार्य सांगोपांग पार पाडले- नरसिहांना पावलोंपावली अंतर्यामी भगवंतांची सोबत

जाणवत होती. लोक सुद्धां तो लग्नसोहाळा कमालीच्या साफल्याने पार पाडल्याचा आनंद मनोमनी अनुभवीत होते.

नरसिंहानीं त्यांच्या 'मामेरा' काव्यात म्हटल्या प्रमाणे, अल्प काळांतच पत्नी माणेक महेती आणि पुत्र सामळदास मृत्यू पावलेले दिसतात, त्या दरम्यान पुत्री कुंवरबाईचे लग्न 'उना' गावांत श्रीरंग महेतांच्या पुत्राबरोबर झाले होते. उना गाव, दक्षिण सौराष्ट्रात गीरपंथकच्या दक्षिणेला आहे. मुलीच्या सीमंत समारंभापूर्वी ( पहिल्या गर्भारपणात करायचा समारंभ) नरसिंहाच्या जीवनाशी संबंध असणाऱ्या दोन घटना घडल्या. त्यांपैकी प्रथम कोणती आणि नंतर कोणती, हे सांगणे कठीण आहे. यापैकी एक घटना 'हुंडी' ची आहे. विदेशी यात्रिक जुनागडची यात्रा करायला आले होते. द्वारकेची यात्रा करायची त्यांची ईच्छा होती. द्वारकेचा मार्ग धोकादायक असल्यामुळे रोकड रक्कम बरोबर घेऊ नये, असे यात्रिकांना वाटत होते. एकाद्या व्याराऱ्याशी रोकड रक्कम देऊन त्याची हुंडी (पावती- पत्र) घेऊन, यात्रेला निघावे असें त्यांनी ठरवले. शहरात त्यांना कोणी सधन व्यापारी न मिळाल्यामुळे ते निराश झाले होते. तिरस्कार आणि कुचेष्टा करणाऱ्या नागरांनी त्याना नरसिंह महेतांचे घर मुद्दाम दाखवले. ईश्वरावर परम श्रद्धा ठेवणाऱ्या नरसिंहानी ७०० रुपये मोजून घेऊन द्वारकेच्या सामळशा शेठ च्या नावे हुंडी लिहून दिली. यात्रिक द्वारकेला पोचले. तपास करूनही त्यांना शामळशा सेठ सापडला नाही. आपण फसवलो गेलो असा त्यांनी समज करून घेतला. तेवढ्यात शामळशा शेठ त्यांना भेटले आणि त्यांनी यात्रिकाना ७०० रुपये नगद दिले. प्रत्यक्ष भगवान शामळशा शेठ बनले, आणि त्यांनी भक्तांची लाज राखली असा अत्यंत भक्तीभावपूर्वक उल्लेख नरसिंहाच्या हुंडी या काव्यात आढळतो.

वि. स.१५०१ मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी, सोमवार रोजी मध्यरात्री दुसरी एक रमणीय घटना घडली, असे सांगण्यात येते कीं. नरसिंहाचे काका अनेक वर्षापासून मांगरोल (सोरठ) ला राहात होते. तिथे त्यांचा काय व्यवसाय होता हें कळायला मार्ग नाही. ते कदाचित् तिथे हकिमांची किंवा तत्सम कांही नोकरी करीत असावेत. दरवर्षी तळहाती तुळशीचे रोप घेऊन , द्वारकाधीश रणछोडरायांच्या दर्शनार्थ, द्वारकेला जायचा त्यांचा नियम होता. हा त्यांचा नियम ६० वर्षे अव्याहत चालत होता, अशी ग्वाही त्यांचे वंशज त्रिकमलाल भवानी शंकर त्यांच्या 'पर्बतपचासी' काव्यांत देतात. शिरस्त्याप्रमाणे यावर्षी पण ते निघाले. सीताभाई नावाने ओळखल्या जाणाऱ्या 'विष्णूतीर्थ' ठिकाणी ते रात्री राहिले. मांगरोळच्या उत्तर पश्चिमेला २० कि.मीटर अंतरावर 'आजक' गाव आहे, त्याच्या बाजूलाच हे ठिकाण आहे. भगवंतानी रात्री स्वप्नात येऊन त्यांना सांगितले कीं मीच तुझ्याकडे मांगरोळला येतो आहे. दुसऱ्या दिवशी भक्त पर्वतदास मांगरोळला परत आले. रोजच्या नियमानुसार, ते गोमती विहिरीवर स्नानाला

गेले. त्याना विहिरीत रणछोडरायांचे काळ्या पाषाणाचे दशांगुल रूप सापडले. पर्वतदासांच्या घराजवळ, नगराच्या उत्तर दरवाजाच्या आंत ही गोमती विहीर आहे. त्याच दिवशी दीवचा वासुदेव सलाट (शिल्पकार) काळ्या पाषाणाचे एक छोटेसे सिंहासन घेऊन समुद्रमार्गे द्वारकेला जात होता. समुद्रांत तुफान झाल्यामुळे तो मांगरोळ बंदरात उतरला. पर्वतदासची हकीगत त्याच्या कानावर गेली. पर्वतदासांकडे जाऊन त्याने सिंहासन, रणछोडरायांच्या आसनासाठी, त्याच्या स्वाधिन केले. तो दिवस उत्सवाप्रमाणे साजरा केला गेला. रात्रीच्या समारंभात नरसिंह हजर होते. सारी रात्र त्यांनी प्रभुकीर्तनात घालवली. त्यांना तहान लागली, तेव्हा त्यांची विधवा सून पाण्याची झारी घेऊन आली. नरसिंह भक्तिरंगात इतके रंगले होते कीं प्रत्यक्ष परमेश्वर मोहिनी रूपाने आले आहेत अशा आशयाची त्यानी तीन पदें म्हटली. चौथ्या पदांत मात्र 'ही सुनबाई ' असा निर्देश केला. ही चारी पदे झारीची पदे म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यापैकी तीन नरसिंहाच्या उच्च प्रतीच्या प्रतिभेची द्योतक आहेत.

मुलगी कुंवरबाईचे लग्न केव्हां झाले, याचा उल्लेख नरसिंहानी कुठेही केलेला नाही. मामेरू च्या एका पदात पत्नी आणि पुत्राच्या मृत्यूनंतर कुंवरबाईचे 'आणु' (वयांत आल्यानंतरची, भेटी देऊन पाठवणी ) येऊन ती सासरी गेल्याचा तसेंच हुंडी च्या पत्रात कुंवरबाईच्या सासऱ्याकडून खुशालीचा समाचार येत असल्याचा, उल्लेख आहे. मुलीचा सीमंत (डोहाळे समारंभ) समारंभ 'उनाला' उजवला गेला. निमंत्रण पत्रिका मिळाल्यावर पत्नी पुत्र नसल्यामुळे स्वतः नरसिंह मामेरु (मामाकडचा अहेर) करायला त्या समारंभाला गेले. हा दिवस चैत्र शुद्ध द्वादशी होता आणि वर्ष वि.स. १५०१ इ.स.१४४५ असावे. नरसिंह व्याह्यांच्या घरी पोचले. स्नानाला पाणी आले, तें आधणपाणीच होते. नरसिंहानी ईश्वरप्रार्थना केली आणि पाऊस पडून ते पाणी योग्य तितके थंड झाले. कुवरबाईच्या आजेसासूला (मामाकडच्या आहेराची) मामेरू ची यादी करायची नरसिहानी विनंती केली. नरसिंह व्याही, अत्यंत धनाढ्य आहेत अशा समजुतीने की कल्पनेने, आजेसासुबाईनी खूपच महागडी यादी बनवली. प्रत्यक्ष भगवान आणि लक्ष्मी, दामोदर दोशी आणि त्यांची पत्नी बनून आले आणि त्यांनी मामाकडचा अहेर (मामेरु) पुरा केला, असे नरसिह म्हणतात. विवांह काव्याप्रमाणे मामेरु हे काव्यही, नरसिहांनी उच्च प्रतिभेच्या आविष्काराने लिहिले आहे. आई वेगळ्या मुलीकडे रिकाम्या हातानी नरसिंह गेले. त्या प्रसंगातली मनोवेदना एका मनोवेधक पदांत आहे. मामेरु (मामाकडचा आहेर) पुरे केल्याची त्यांची पदे अद्‌भुतरसाने परिपूर्ण आहेत.

या ४ प्रसंगानंतरचा ५ वा प्रसंग, नरसिंहाच्या जीवनातला, भक्त म्हणून कठिण कसोटीचा आहे. त्या काळांत जुनागडला राजवीरा मांडलिक राजा होता. त्यांच्या दरबारात हा प्रसंग घडला. ईश्वर भजनात भाग घेण्यासाठी नरसिंहाकडे अनेक स्त्री-पुरुष भक्तजन येत असत. नरसिंहाच्या

वैष्णव नीतीचा द्रोह करणाऱ्या लोकांनी, नरसिंह वर्णधर्माचा भंग करणारा लंपटा आहे, अशी नालस्ती दूरवर पसरवली. नरसिंहाची चहाडी थेट राजापर्यंत पोचली. परिणामस्वरूप राजाज्ञेने नरसिंह पकडले गेले. या दामोदर भक्ताला अशी ताकीद दिली गेली की जर तू खरा आणि प्रामाणिक वैष्णव असशील, तर तुझी इष्ट देवता प्रत्यक्ष येऊन तुला हार घालील. नंतरच तुझी मुक्तता होईल. या प्रसंगी नरसिंहानी 'हारसभेना पद' म्हणून विख्यात असलेली पदे म्हटली होती. यापूर्वीच्या चारी प्रसंगात आर्तभक्तीचा चैतन्यशील प्रवाह पाहायला मिळत नाही. या पदावलीत मात्र त्याचे प्रमाण कमाल मर्यादेत आहे. अर्थात् हा प्रसंग तीव्र परीक्षेचा होताच. रात्रभर त्यांनी भगवंताचे गुणगान केले आहे आणि प्रार्थनेचा प्रवाह वाहू लागला. अरुणोदय झाला. आकाशांत मृगनक्षत्र (मार्गशीर्ष महिना असल्यामुळे) मावळायला आलें. तोपर्यंत नरसिंह भगवंताची गुणगानपर पदें गात होते. शेवटी भगवान केशवाने आपल्या गळ्यातला हार काढून, नरसिंहाच्या गळ्यात घातला. नरसिंहानी मोठ्या समाधानाने या घटनेचे पद म्हटले आहे.

पूर्वी स्पष्ट केल्यानुसार 'हारसमे' च्या पदांअखेर नमुद केलेला हा दिवस वि.स.१५१२ मार्गशिर्ष शुद्ध सप्तमी, रविवार (ता.१६-११-१४५५) हा होता. या प्रसंगापूर्वीच कन्या कुवरबाई विधवा झाली होती. बहुदा नरसिंहाच्या मृत्यूनंतर, कीर्तनकारांनी हारसमे चा प्रसंग व्यवस्थितपणे सविस्तर मांडला. राजवीरा मांडलाकच्या दरबारात, नरसिंह, वैष्णव संन्यासी भीम आणि स्मार्त संन्यासी, यांच्यात संवाद आणि चर्चा झाली. हारसमें चा सुरवातीचा मोठा भाग, निरूपणाने भरला आहे. त्यांत 'हारसमें' ची पदे, प्रसंगोपात् घेतली आहेत. 'हारमाळा' मधे प्रथम ५० पदे होती. नंतर १०८ झाली. शेवटी शेवटी तर ही संख्या २५०, ३०० पदांपेक्षाही वाढली. हा क्रम अनेक वर्ष चालला. नरसिंहांनी भिन्न भिन्न प्रसंगी जी जी पदे लिहिली, त्याचाही समावेश, या वाढलेल्या 'हारमाळा' मधे केला गेला. गुजराथी भाषेचा उच्च प्रवचनकार प्रेमानंदानी, या पदांचे संकलन केल्याचे सांगण्यात येते, परंतु अजूनपर्यंत तसा खात्रीदायक पुरावा उपलब्ध नाही.

नंतरच्या प्रवचनकारांनी एका आदर्श भक्ताच्या पौराणिक कथांप्रमाणे, स्वतःच्या रचना, स्वतंत्रपणे मांडून 'हुंडी आणि मामेरू' निरूपले आहे. गुजराथी साहित्याच्या इतिहासांत नरसिंह हे असे एक भक्त झाले, की ज्यांचे 'नायक' म्हणून चित्रण करायचा प्रयत्न झाला. नरसिंहाच्या जीवनात अनेक प्रसंग आले. त्यांत कवी प्रेमानंदांनी, नरसिंहाच्या पित्याचे 'श्राद्ध' म्हणून एक रचना करून भर टाकली. त्याचा आशय असा आहे. पत्नीच्या विनंतीनुसार, भोजन सामुग्री आणायला नरसिंह बाजारात गेले. जवळच कुठेतरी भजन चालले होते. नरसिंह भजनात रमले. घरी पत्नी वाट पाहात होती. भगवान नरसिंहाच्या रूपाने घरी आले आणि त्यांनी

वडिलांचे श्राद्ध सांगोपांग पार पाडले. रात्री नरसिंह भजन करीतच घरी आले, तेव्हा त्याना सर्व हकीगत समजली. हा प्रसंग नरसिहानी काव्यमय केला आहे. असे सिद्ध करणारे एकही पद अजूनपर्यंत ज्ञात नाही. हे काव्य प्रेमानंदानी नरसिंहाच्या खाती रुजू केले, हेच शक्य वाटते.

नरसिंहाच्या जीवनातल्या घटना म्हणजे, लग्नानंतर भावजयीच्या कटू बोचण्यामुळे केलेला गृहत्याग, आणि तपश्चर्या तळाजागावी पुनरागमन, शांतिमय जीवनासाठी, जुनागड मधील नागर लोकांत निवास , तेथील जीवनातले त्यांनी काव्यमय केलेले प्रसंग - अपवाद फक्त मांगरीलमधील झारीचा प्रसंग आणि शेवटची घटना, राजवीरा मांडलीक नी घेतलेली हाराची कसोटी या होत. हे वर्ष वि.स.१५१२ (इ.स.१४५५) हे होय. यानंतर नरसिंहाचे जीवन कसे आणि कुठे गेले हे जाणून घ्यायला आपल्यापाशी कोणतेही विश्र्वसनीय साधन नाही. नंतरच्या काळात सुखसंग्राम आणि 'गोविंदगमन' नावाच्या रचना नरसिंहाच्या नावावर खपवल्या गेल्या. त्यापैकी गोविंदगमन काव्यांत, अंगमां वळीया अने पणीयो ( अंगावर सुरकुत्या आणि पांढरे केस) अशी स्थिती झाली, तेव्हाचे हे काव्य आहे, असा निर्देश आहे. म्हणजेच वृद्धावस्थेत नरसिंहानी हे काव्य लिहिले आहे हे सुचवले आहे. भगवंताचे गुणगान करायला नरसिंहाचा निश्चय होता. म्हणून त्या स्थितीत (कुणी दुसऱ्याच माणसाने ) हे भखियुं (भक्तीगान) लिहिले असावे. कारण नरसिंहाच्या कालांतर नाहीच पण इतर कुठेही न दिसलेले हे भक्तिगीतांचे रूप हे या काव्य रचनेत आहे. अर्थात् हे काव्य नरसिंहाचे असेल असा विश्वास वाटत नाही. नरसिंहाच्या पुष्कळशा काव्य रचना आहेत, त्यावरून ते दीर्घकाल जगले असे मानतां येईल. प्रश्न असा आहे कीं त्यांचा वृद्धापकाळ कुठे गेला असावा. इ.स.१४७० च्या, डिसेंबर ४ तारखेला (वि.स.१५२७ ) महंमद बेगडांच्या सैन्याने जुनागडचा किल्ला सर केला. एका मतानुसार मांडलीक मारला गेला, अन्य मतानुसार पकडला गेला) प्रचलित मतानुसार, बेगडाची प्रतिज्ञा (मांडलीक' ला जीवंत पकडायची) खोटी ठरू नये म्हणून, एका भलत्या माणसालाच 'मांडलीक' म्हणून अहमदाबादच्या सुलतानासमोर हजर केला. त्याला मुसलमान करण्यांत आले. मृत्यूनंतर त्याची कबर, अहमदाबादमधील माणेक चौकाजवळ हलवायांच्या आळीत बांधण्यात आली. जुनागडचें 'चुडासमा' चें राज्य महमंद बेगडाच्या सत्तेखाली आले, तोपर्यत नरसिंह बहुतांशी जीवित असावेत. मांगरोल (सोरठ) च्या समुद्रकिनाऱ्यांवरील जुन्या स्मशानाला नरसिंहांचे स्मशान म्हटले जाते. त्यामुळे असं दिसते, कीं मांडलीक च्या वाढत्या उपद्रवामुळे नरसिंह पर्वतदासांकडे मांगरोलला (सोरठ) आले असावेत. नहसिहांचे विशाल साहित्या पाहून खात्री वाटते त्यांनी जुनागडपासून आरंभ केला आणि थेट मांगरोळ (सोरठ) पर्यंत शक्य झाले तोंवर वेळोवेळी अनेक काव्यरचना केल्या. पर्वतदास उच्च कोटीचे भक्त होते. नरसिंहाच्या सहवास आणि सत्संगाची परिणिती म्हणून कीं काय पर्वतदासांची पदे उपलब्ध आहेत. काका पुतण्यांमधे ३० वर्षांचे अंतर होते. नरसिंहाच्या मृत्यूपर्यंत पर्वतदास

जीवित नसणारच नरसिहांच्या उत्तरआयुष्यात पर्वतदासांच्या मुलाने अगर मुलीने त्यांना संभाळले असले पाहिजे.

नरसिहांच्या साहित्यांत मराठी संत नामदेवाच्या नामा म्हणे या रचनेची 'भणे नरसैयो' अशी छाप दिसते (अर्थात गीतगोविंदांत भणति जयदेवः अशी रचना आहे. आणि नरसिंहानी 'गीतगोविंद' अभ्यासले होते. त्यांनी जयदेवाचा नामनिर्देश केला आहे, एवढेंच नव्हे, तर 'गीतगोविंद' चे अनुकरण करून त्यांनी 'चातुरी' काव्य रचलेली आहे) नामदेवांच्या अभंगाची छाया, नरसिहाच्या 'झुलणा' च्या विपूल रचनांवर पडल्यासारखी वाटते. तसेच 'हारसमे' च्या एका पदांच्या देवा, अहमची वार कां बधीर होईल- आपुला भक्त कां विसरी गेला' या ओळीत मराठी छाप स्पष्ट दिसते. नरसैयाच्या स्वामी हाही शब्दप्रयोग नरसिहांनी वारंवार केल्याचे आढळते. ( भीम, मंडळ, कर्मण वगैरे कवींनी नरसिंहानंतरही चा प्रयोग सुरु ठेवला होता ) हे सर्व लक्षात घेतले की वाटते की नरसिंहावर दक्षिणेतल्या वारकरी संप्रदायाची छाप पडली होती. नरसिंहानी जसा संस्कृत भाषेतील भागवतपुराण, गीतगोविंद, सारख्या ग्रंथांचा गाढ अभ्यास केला, तसा नामदेव आणि समकालीन कबीर साहित्याचा पण अभ्यास केला. या अभ्यासाच्या जोरावर, नरसिंहाच्या उज्ज्वल प्रतिभेने, उच्च दर्जाचे भक्ती साहित्य भगवान् कृष्णांच्या लीला विषयक साहित्य आणि नामदेवांच्या 'सुदामचरित्राचे' अनुकरण करून 'सुदामानां प्रभातियो' वगैरे साहित्य निर्माण केले. नरसिंह केवळ कवी नव्हते ते उच्च कोटीचे भक्तही होते. म्हणूनच 'भक्त माळे' मधे, नाभाजीनी यांच्या चरित्राचा समावेश केला. यांची पदे माधुर्याने ओतप्रोत भरलेली आहेत. पुष्टिमार्गीय मंदीरात, वज्रभाषीय कवींची पदें-कीर्तने गायली जातात, त्यांच्यासमवेत नरसिंहाची लीलाचरित्रांत समावेश करण्याजोगी पदें, जुन्या काळापासून गायली आणि लिहिली जात आहेत. वल्लभाचार्य महाप्रभू आणि त्यांचे चिरंजीव, विठ्ठलनाथ गुसाईजी या दोघांनी गुजराथ सौराष्ट्रात पुष्टिमार्गाचा (भक्तिमार्गाचा) प्रसार केला. प्रत्यक्ष पर्वतदासांचे वंशज या मार्गाचे अनुयायी झाले. आणि त्यानी 'वैष्णव' हे आडनाव घेतले. नरसिंहाच्या भक्ती-साहित्यानें ,वैष्णव भक्तीमार्गाला यापूर्वीच चैतन्य दिले होते. ते तर गुजराथ सौराष्ट्रातले भक्तीमार्गाचे पुरस्कर्तेच होते. नरसिंहानी उत्साहाला उधाण येईल, अशी हजारों पदे लिहिली आणि ती पदे काव्यरस शास्त्राच्या सिद्धांतानुसार होती. गुजराथी भाषेत साहित्य निर्माण करणाऱ्यांमध्ये नरसिंहाचे आद्य स्थान आहे. यामुळेच गुजराथी साहित्याच्या इतिहासात त्यांना आद्यकवी म्हटले आहे. अलिकडे गुजराथ म्हणजे जुनी गुजराथी भाषा किंवा मध्यकालीन गुजराथी भाषासाहित्य भरपूर प्रमाणात उपलब्ध झाले आहे. त्यापैकी काही प्रसिद्धही झाले आहे. तरीपण आदिकवी नरसिंहाना 'आदिकवी' म्हणून अमान्य करण्याजोगा एकही पुरावा उपलब्ध नाही.

# २ साहित्य साधनेच्या मार्गांत

वयाच्या १८ व्या वर्षी नरसिंह जुनागडला राहायला आले. अर्थात् तळाजांतच त्यांना अभ्यासाची संधी मिळाली असणार. अध्यापन कार्य करणाऱ्या पंड्या कुटुंबातील असल्यामुळे, नरसिंहांनी वडिलांपाशी अगर तळाजांतील कुणा विद्वानाशी संस्कृतचा अभ्यास केला असला पाहिजे. त्यांची 'रास सहस्र पदी'ची कवने पाहिली की खात्री वाटते, नरसिंहानी भागवत पुराणाच्या दशमस्कंधाचा चांगलाच अभ्यास केला असला पाहिजे. अनेक ठिकाणी मूळ शब्द जसेच्या तसे ठेवून त्यांनी स्वतः च्या शब्दांत भावदर्शन केलेले आढळते. वडनगरहून आलेल्या दीक्षितांच्या तोंडी त्यांची खालील काव्य घातले आहे.-

हा भाग 'विवाह' काव्यातला आहे.

**भक्तमहिमा कड्यो, भागवतमां लह्यो**
**पुराण, गीता सुणी वेदवाणी -**
**विष्णुनां भक्ता ते अमळ होये सदा,**
**संग किये थाय, शुद्ध प्राणी ( आ.च. काव्य पृ.६८)**

(भक्त महिमा सांगितला गेला. भागवतांत लिहिला गेला. पुराण, गीता, वेदवाणीत ऐकला. विष्णूभक्त नेहमीच शुद्ध असतात. त्याच्या संगतीने प्राणी शुद्ध होतो.) वरील काव्यपंक्ती वाचून खात्री पटते की भागवतपुराण 'अन्य पुराणे' तसेच वेदांबाबत नरसिंहाचे ज्ञान परिपूर्ण होते. नागर ब्राह्मणात, आपली वेदसंहिता तोंडपाठ करण्याची प्रथा जुन्या काळापासून प्रचलित होती. त्याशिवाय संस्कृत पाठ्यपुस्तकांचा अभ्यास तसेंच आवडीनुसार आणि गरजेनुसार पुराणादी ग्रंथाचा अभ्यास केला जात असावा, असे दिसते. शुकदेवानी आणि गीतगोविंदकार जयदेवानी भगवान कृष्णांच्या शृंगार लीलेची मजा अनुभवली होती, हे नरसिंह सांगतात। सारमा सार शणगार-रस कीधोला, ते जाणी थई पुरव मोडे ऐ रस शुक देव चाखियो, नाथ लखणी हाथ ओडे (नरसी मेहताना पद पृ २०५ )

(शृंगार रस सर्वांत महत्त्वाचा (रसराज) मानला जातो. त्यांची जाणीव झाली म्हणजे शरम

वाटते. हा रस लक्ष्मीवराच्या (कृष्णाच्या) आड राहून, शुकदेव, जयदेवांनी चाखला.

**टीप** - भगवतात जयदेवांनी शृंगार वर्णन केले. जयदेवांनी 'गीत गोविंदात' शृगार वर्णन केले. शृंगर आणि त्याचा रसा स्वाद कृष्णाचे निमित्त करून घेतला.

दुसऱ्या ठिकाणी-

**ए रस जाणे डावरलो रे जोगी, केवली मुनीवर जाणे रे**
**शुकसनकादीक नारद जाणे, जेहने वेद वखाने रे**
**के रस जाणे रे व्रजनी गोपी, के जैदेवे पीधो रे**
**उगरतो रस हलतो हुतो नारसिंह ए झोंटीने लिधोरे ।**

न. न. पद पृ.५०

( क्वचित् एखादा जोगी आणि केवळ मुनी हा रस जाणतात. ज्यांची वेद स्तुती करतात, ते शुकसनकादिक आणि नारदमुनी जाणतात, जो रस व्रज गोपींनी जाणला जो जयदेव -प्यायले तो उतु जाऊन वाहात होता, तो नरसिंहानी हिसकावून घेतला.)

नरसिंहाची 'गीतगोविंद' शीही जवळीक -

**त्वमसि शृंगार मम हार उरभूषणा**
**त्वमसि मम् मग्न चित संग दोले**

न. म. पद पृ १०

(हे शृंगारा, तूं माझा हृदय-भूषण हार आहेस. माझ्या तल्लीन मनांत, मनोभावना बरोबर (डोलणारा, तूं आहेस )

आणि 'राससहस्त्रपदी' च्या एका 'पदांत **धीरसमीरे, जमनातीरे त्रिविधा तनना ताप शमे'**

(धीरगंभीर पवनांकित यमुनातीरी, तीन प्रकारचा शरीर ताप शमतो) नरसिंह 'गीतगोविंद' मधील शब्द ज़सेच्या तसेच उचलीत आहेत-

अहेतुकपणाने केवळ संबंध आल्यामुळे नरसिंहाला मराठीचे जे ज्ञान झाले त्याचा त्यांना उपयोग करावासा वाटला. झुलणांच्या शेकडो ओव्यांमागे, नामदेवांच्या अभंगांचे अनुकरण स्पष्ट आहे.

त्यांच्या प्रकाशित साहित्याचा अभ्यास करताना त्यांच्या विशाल साहित्यसेवेची कल्पना येते. यांच्या रचना मुख्यतः चार विभागात विभागतां येतात.

१) आत्मचरित्रपर रचना २) व कथा वर्णन काव्य

३) ज्ञान भक्ती निरूपण तशी उपदेशात्मक पदे, आणि ४) उत्कट भावनापूर्ण रसप्रचुर

भावगीतें - भावगीतात नरसिहांनी आत्मकेंद्री भावगीते तशीच चातुरीओ ( चातुर्यपूर्ण) भावगीतांचा समावेश केला आहे.

**१) आत्मचरित्र पर रचना**

पूर्वी नमूद केंल्याप्रमाणे खालील आत्मचरित्रपर रचना मूळ स्वरूपात उपलब्ध आहेत. १) विवाह २) मामेरु ३) झारी ४) हुंडी आणि ५) हार - या ५ रचनांतून नरसिंहाचे व्यक्त झालेले चरित्र पूर्वी सांगितले आहेच. वर्णनात्मक रचनांतून दोन गोष्टींचा स्पष्ट आविष्कार होतो. अ) त्यांची आर्तभक्ती आणि आ) कवी प्रतिभा

**अ) आर्तभक्ती**

'झारी' रचना वगळून बाकीच्या चारी रचनांत नरसिंहावर आलेल्या प्रत्येक संकटांत, प्रभूच्या साहाय्यासाठी केलेली आर्तयाचना आहे त्याची कमीजास्त प्रमाणांतली व्याकुळता, स्पष्ट दिसते. विवाह काव्यांत ज्यावेळी ते असं म्हणतात.

**'कष्ट पडे तिहां साह्य थाओ तम्यो'**
**गाउ जस ताहरा मधुरी वाणी - शी-६**

(कष्ट पडतील, तेव्हा मदतरूप व्हा, मधूर वाणीने मी तुमचा जयजयकार करीन ) तेव्हां त्यांचा मुख्य उद्देश, मधूर वाणीने भगवंताचे गुणगान करण्याचा आहे. त्यांचे संकटसमयी प्रभुने कष्ट दूर करावे, हे सुचवणे, म्हणजे केवळ निमित्त आहे. एका गोष्टीची त्यांना पक्की खात्री आहे. **"करमया भाग तो भोगव्ये छुटको, निपजे सर्व जे होय भावी"** (कर्मभोग, भोगुनच सुटका होते भविष्यात असेल ते होते ) म्हणूनच यापुर्वी त्यांनी म्हटले होते - **"हरिरस गावा ने जे मळे खाना ने हरिइच्छा मने संतोष त्यावी"** ( हरिभजन करावे, आणि मिळेल ते खावे, हरिइच्छा मला संतोष देते)

नरसिंहाना स्वतःला कांहीच नको होते. मात्र सुरुवातीच्या निरनिराळ्या प्रसंगात आणि अचानक आलेल्या नैमित्तिक संकटात, प्रभूने आपल्याला निभावून न्यावे. एवढीच इच्छा त्यांनी व्यक्त केली आहे. ते प्रभूचे परम भक्त होते म्हणून कोणत्याही आपत्तीत **"पुरशे मनोरथ कृष्ण कामी"** ( ईश्वर मनोरथ पुर्ण करील ) अशी त्यांची खात्री होती. म्हणुनच

**" आपणु घर ते आद्य मोटु सदा,**
**निर्धन विहिवा ते केम थाशे ?"**

(आपले घर प्रथमपासुनच मोठे आहे, इथले लग्नकार्य थाटामाटांत कसे होणार **नाही** ?) माणेक महेताच्या प्रश्नाला त्यांनी वरील उत्तर दिले- आणि लगेच

**" ध्यान धर कृष्णनु राख मन प्रसन्न तुं-**
**साह्य थशे, नरसैया च्या स्वामी "**

( कृष्णाचे ध्यान कर, मन प्रसन्न ठेव- नरसिंहाचा स्वामी साहाय्य देईल) अशा प्रकारची खात्री पटवली- पुढे लग्नपत्रिका आल्यावर माणेक महेता म्हणते घर मांहे हुँ कोई नथी देखती ( घरात मला काहींच दिसत नाही ) तेव्हा नरसिंह हे स्पष्ट करतात-

**शेठ छे सामलो, सर्वथी छे भलो**
**राख विश्र्वास ते देशे आणि**
**नरसियो नागर तिहां रंक छे बापडो**
**करशे संभाळ पोतांनो जाणी -**

(सावळा शेठ आहे, सर्वांपेक्षा मोठा आहे. तो सारे आणून देईल, असा विश्वास ठेव. त्याचा नरसिंह नागर बिचारा गरीब आहे. हे ओळखून तो आपुलकीने, त्याचा सांभाळ करील) विवाह काव्याच्या १९ साव्या पदापासून नरसिंह विनवणी सुरू करतात. आणि द्वारकेच्या यात्रेला निघून जातात. तिथेही विनवणी सुरु आहेच.

**भक्त तमारो ने तग्यो छो भक्तना**
**भक्तविना परपंच खोटो -**
**भक्त नरसैयांनी भीड भांगो जई**
**नागरी ज्ञातनो थाय मोटो पु.५**

(भक्त तुमचा आणि तुम्ही आहात भक्ताचे. भक्ताशिवाय ईश्वराचा संसार खरा नाही. भक्त नरसिंहाचे संकट दूर होईल, तेव्हाच तो नागर जातीत मान्यवर होईल.)

या विनवणीची तीव्रता २७ साव्या पदांत वाढलेली वाटते.

**मित्र तु माधवा कंथ-राहीवरां तु बिना कृष्णजी केने जाचु ?**
**करमच्या भोग ते भोगव्ये छुटका एक निश्र्चे तारी भक्ती सांचु**

(माधवा तू मित्र आहेस, रुक्मीणीचा नाथ आहेस. तुला सोडून कृष्णा, कुणाला शिणवूं ? कर्मभोग भोगुनच मुक्ती होते. एकाग्रतेने तुझी भक्ती करणे, हेच (जीवनाचे) सार आहे )

हे खरे आहे कीं विवाह काव्यांत नरसिंहाची आर्त उत्कंठा तितकीशी अनुभवास येत नाही. 'मामेरा' मधे तिचा थोडासा अनुभव येतो. कुंवरबाईच्या आजेसासुने 'आंदणा' ची लांबलचक यादी, सासरच्या देणग्यांनी भरलेल्या थाळींत ठेवली, तेव्हापासून नरसिंहाची आर्त विनवणी सुरु झाली. १४ व्या पदापासून १८ व्या पदापर्यंत, काकूळती व्यक्त होत आहे. १७ व्या पदात नरसिंह प्रभूला विनवणी करीत आहेत.

**१) वार यै, विठ्ठला व्हारे वेगे चडो, रखे नागरी नातमां हांसी थाये,**
**आगे भक्त तम्यो अनेक ओधारिया, तमने तजी नाथजी केने थाये**

**२) भक्त प्रहलादने कारणे कृष्णजी, वास पुरयो तमे काछ माहे,**
**भक्त उगारियो असुरने मारियो, भक्तवच्छल-बिारद वेद गायो.**
**३) दौपदि कारणे धाया 'हरि' पसमसी, पूरियां चीर अनेक जाते**
**राखिये लाज ए कार्य छे तम तणुं, येलपण नाणशो आणि वाते.**
**४) कुंवर बाईना कोड तो पूरजो, जगत माहे जस तारो थाशे**
**नरसियाच्या स्वामी आज आवो न तो आद्य नी अंतनी लाण जशे**
**या वेळी विठ्ठला लौकर मदतीला धावा कदाचित नागर जातीत**

१) माझें हसें होईल. यापूर्वी अनेक भक्तांना तूं संकटमुक्त केले आहेस. तुला सोडून मी कुणाचे ध्यान करूं ?

२) हे कृष्णा, भक्त प्रह्लादासाठी तूं खांबात (लाकडांच्या) अवतरलास. भक्ताला सोडवलंस, राक्षसाला मारलंस. तुझे 'भक्त वत्सल ब्रीद' आहे असे वेद म्हणतात.

३) द्रौपदीसाठी तूं लगबगीने धावलास, आणि तिला अनेक प्रकारची वस्त्रे पुरवलीस. माझी लाज राख हे कार्य तुझे आहे (तुझ्या भरवशावर आहे) सर्व काही ठीक झाले पाहिजे.

४) कुंवरबाईचे लाड तूं पुरव. नरसिंहाच्या स्वामी, आज ये, नाहीतर प्रथमपासून शेवटपर्यंत फजिती होईल.

या प्रसंगी राधेने कृष्णाला अडवूं नये म्हणून नरसिंह तिची पण प्रार्थना करतात. नागर असल्यामुळे एक युक्ती पण आजमावत आहेत. जसे

**" भणे नरसैंयो मेल मम नायने**
**निकवशे कादव कोने धोतां "**

(माझ्या नाथाला (कृष्णाला) पाठवून दे, नरसिंह म्हणतात, घर धुवायला घेतले की चिखल निघतो )

नरसिंहाचा स्पष्ट आशय असा की राधेने कृष्णाबरोबर नानातऱ्हेचे विलास केले आहेत. नरसिंह ते सारे गौप्य, उघड्या वर आणतोय. !

हुंडी च्या ४ थ्या पदांत आपण 'हुंडी' लिहून देण्याचे साहस केले - त्याचे वर्णन करताना म्हणतात -

**"न काळजो वणज में कीधो छे वीठला,**
**राखशो शरम, तो लाज रहेशे**
**जो हुंडी पाछी फरीने आवशे**

**'भक्त वत्सल' तुने कोण कहेशे ?**

(विठ्ठला, मी हा धंदा केला आहे तूं दूर्लक्ष करू नकोस. मी ते केले आहे. माझी लाज तूं राखलीस, तर अब्रू राहील, हुंडी ( वटवली न गेल्यामुळे ) परत आली, तर तुला 'भक्तवत्सल' कोण म्हणेल ?

यापुढे जाऊन श्रीकृष्णाला आणि लक्ष्मीला पण ते विनवतात -

**जाग कमलापती हजी का सुई रह्यो ?**
**सेज रामातणी आज भावी ?**
**वार लागे घणी, लाज जाये हरि,**
**पछे शुं कृष्णजी, करशो आवी ?**
**मेल मग नायने, न भर तुं बाथने**
**का रे कमला, तुने लाज ना' वे ?**
**दासनी हास थशे, लाज तारी जशे**
**पछी तुंने व्हालाजी, कोण ध्याशे ?**

(उठ कमलापती, अजून झोपला आहेस ? आज लक्ष्मीची शय्या एवढी आवडली ? उशीर होत आहे, हरि माझी बेअब्रू होईल नंतर येऊन कृष्णा काय करशील ?)

कमले माझ्या कृष्णाला पाठव. त्यात मिठी मारूं नको. अग कमला, तुला लाज वाटत नाही कां ? भक्ताचे हसं झाल तर तुझी नाचक्की होईल आणि तसें झालें तर तुझे ध्यान कोण करील ?)

या ३ ही काव्यात आर्तभक्तीची आत्यंतिक उत्कटता अनुभवास येत नाही. पण 'हारसमे' ची पदे वाचतांना आर्तभक्तीची उत्कटता उत्तरोत्तर वाढत असल्याचा अनुभव येतो. या काव्याच्या मंगलाचरणाच्या पहिल्या पदातच आर्ततेनें चिन्ह दिसते.

**प्रणमुं प्रेमे परिब्रम्ह पुरुषोत्तमने**
**दासनी वीनती, हदे धरजो**
**आज समे प्रभु मुंने आकरो आवियो**
**निज चरण-शरण संभाळ करजो-**

(परब्रम्ह पुरुषोत्तमाला मी प्रेमाने प्रणाम करतो. दासाची विनंती मान्य कर. प्रभू आज माझ्यावर मोठे संकट आले आहे. मी तुझ्या चरणाशी, शरण आहे. माझा सांभाळ कर) इथे 'आकरो समे' या शब्दांत आर्तता दिसते. नरसिंह तेजस्वी नागर जातीचे आहेत म्हणून वस्ताद आहेत. कारणे अजमवण्यात आणि युक्त्या योजण्यांत ते कुशल आहेत. यापूर्वी 'मामेरा'

'पदांत' '**निकळशे कादव कोठी धोता**' ही उक्ती, एक युक्ती प्रयोगच आहे. इथे

**जो माहारां कर्मने भाणवेश, भूधरा-**
**पतितपावन तारा बिरद जशे**
**छांडवा तोहे, केम छुटशो सामळा ?**
**छोडेशो जो, उपहास थाशे "**

( हे भूधरा, माझ्या कर्मांवरच मला तू सोडवशील, तर तुझे पतितपावन हे ब्रीद (ध्येय) राहणार नाही. तुला सोडून द्यायचे म्हटल, तरी तूं, श्याम, सुटशील कसा ? आणि तूं मला सोडलंस तर तुझा उपहास होईल.) नरसिंहाचा आणि प्रभूचा दोघांचाही उपहास होईल, हें इथे सुचवले आहे. आता प्रभूला सावधानं करण्याचा यांचा प्रयत्न पहा. " **देवा, अमची वार का बधीर होईल ? " आपुला भक्त कां विसरी गेला ?**

**ध्रु प्रह्लाद, अमरिख, विभीषणा,**
**नापा- चें हाथ तें दूध पिऊन**
**म्लेंच्छ जन माटे ते कबीरनो उधरयो,**
**नामाच्यां छापरां आप्यां छाणी-**

जे-देवने पद्मावती आपी-मुंबे नागरो माटे रखे गेलो काही (देवा, यावेळी काय तूं बहिरा झाला आहेस का ? आपल्या भक्ताला कां विसरलास ? ध्रुव, प्रल्हाद अमरीश, विभीषण (हे तुझे भक्त आहेत) नाम्याच्या हाताने तर तू दूध प्यायला होतास. म्लेच्छ जातीसाठी तूं कबीराचा उद्धार केलास. नामदेवांची कौले तूं चाळून दिलींस. जयदेवाला तूं पद्मावती दिलीस. मला या नागराला मात्र कदाचित् रखडत ठेवशील ) स्वतः नरसिंह नागर आहेत. नागर जात कुशल आणि व्यावहारीक असने. म्हणून प्रत्येक प्रसंगाला नरसिंह पुरून उरतील, असे मानून, स्वस्थ न राहायची विंनती नरसिंह करीत आहेत.

**'कहेशे गुण गातां नागरनो नव ह्यो,**
**भीकमा, तूने को नहि आराधे**

(तुझे गुणगान गाणाऱ्या नागराचा (नरसिंहाचा) तूं झाला नाहीस. कृष्णा तुझी कोणी प्रार्थना करणार नाही ) आणि गोड अशी धमकी देत आहेत आणि तक्रार पण करताहे

**पहा- विवचारां शी प्रीतडी, जे स्त्री रंग रातो ? -१**
**मंडलिक हारने परिभवे तूं रे मदमाते**
**कामी थ्यो रे केशवा, मूं ने परिभवे पापी**
**लोभी छो लक्ष्मीवरा, पूतना संतापी -२**

**(जो स्त्री लंपट आहे, त्या व्यभिचाऱ्याचे प्रेम कसले ?**

मंडलीक राजाला हार प्रकरण अनादरणीय आहे आणि तू उन्मत्त अभिमानी आहेस तू आरक्त आहेस केशवा तूं आमान्यतेची भावना ठेवतोस, मी पापी ठरेन तूं लक्ष्मीवरा, लोभी आहेस, पूतनाला दूखवंणाऱ्यापुढे नरसिंह कडवट पण होताहेत-

**सार कर सामळा, मेल मन- आंबळा**

**उठ गोपालराय, असूर थाये**

**नरसिंयाने रे एक हार आपतां**

**ताहरा बापनुं शु रे जाय ?**

(हे श्याम आतां मनातला अभिमान सोडून सगळं ठीक कर. उठ, उशीर होतो आहे - अरे, नरसिंहाला एक हार देताना, तुझ्या बापाचे काय जाते आहे.)

अहो, टोमणे मारायलाही नरसिंह भीड बाळगत नाहीत-

**आप रे हार, सुत नंद वसुदेवना**
**कंसना भे थकी, नासी गोकूल गयो**
**आ हीरा-शुं रह्यो प्रीत जोडी-१**
**हत्या गरजमाटे माय-बाप ते वे करयां**
**इंद्र-भव-अमर-मुनि- रखी जोतां**
**कंसनो वध करये, काज तारुं सरयुं**
**बापडा मुक्या ते वंन रोतां -२**

(नंद वसुदेवांच्या पुत्रा, देना हार. कंसाच्या भीतीने गोकूळांत पळून गेलास, या हिऱ्यावर हारावर काय प्रेम करीत राहात आहेस ? ) अरे ए, गरजेपायी दोन दोन आई बाप केलेस तू. इंद्र, सारे जग, देव मुनीची इच्छा पाहून तूं कंसाला मारलसं. तुझ काम संपले आणि तूं बिचाऱ्याना वनांत रडत ठेवलस (गोकूळवासियानां ) आणि पुढें -

**आप ने हार, कपटी तू कहानुवडा**
**आ गोकुळमा कपट घणां रे कीधो.**
**व्रजनी वनिता-शुं प्रीत जोडी करी**
**ते रे आहिरडांना दाण लीधा. -१**
**कपट करीने दही दूध ते चोरियां**
**सुर असुर मुनी सर्वे रे जोतां**
**कपट करीने रंगे रास समाडियां**

**पछी बापडा मुक्यां वन रोतां -२**
**पहले प्रीत करी तहिये कपटी न जाणियो**
**हवे शुं कहुं तने अवर वाणी ?**
**भणे नरसियो कर जोडिने विनवुं**
**राख ने लाज, सारंगपाणी -३**

१ (अरे कपटी कन्हैया, देवा आतां हार- गोकुळात भरपूर कपट केलेस . वज्रवासी गोपीवर काय प्रेम केलेंस, आणि नंतर गवळ्याकडून- गोपगोपीकडून- तुझी वसुली (दान) वसूल केलीस.

२ (कपट करून तूं दही दूध चोरलेस. देव दानव पाहात होते. कपट करून रास क्रीडा खेळलास- आणि नंतर बिचाऱ्याना रडत ठेवलंस वनांत.

३ (तूं कपटी आहेस, हे त्यानी न ओळखतां, तुझ्यावर प्रेम केलें आता तुला काही सांगून, वाणी कशाला विटाळू ?) नरसिंह म्हणतात, हात जोडून विनवतो, हे शारंगपाणी, माझी लाज राख

४४ सावे पद असेच टोमण्यांनी भरलेले आहे. त्याची दोन कडवी -

**'को कहशे, महारां उनो महाबलतो कुजात रे'**
**धुतारो निरधारा जाणो, तेह तो तरजात रे-१**
**लंड लंपट चाडियो, सघळे पाडतो शोर रे**
**गोकुळ मांहे घणुं रहेतो, नवनीत कोरो चोर रे-२**

१ (कोणी म्हणेल, हा (कृष्ण) कुणी मोठ्या रांडेचा पुत्र (अवैध) आहे. हीन जातीचा कुविख्यात आहे. हा निश्चित तिरस्करणीय आहे. त्याची जातच वाईट आहे.

२ सगळ्यांची ओरड आहे, हा कृष्ण, स्त्रीलंपट, चहाडखोर आहे. गोकुळांत खूप राहिला. तिथे लोण्याची चोरी करीत होता.

या पूर्वीच्या पदांत आता शिवी देणार नाही असे सांगून हार देऊन टाकायची विंनती करीत आहेत. जे त्यानीं या अगोदर म्हटले आहे.

**१." भांगो भोगळ, भांगो भोगळ, भांगो भोगळ, रागणियारे**

**घेला, घेलाई मुको, मारा व्हाला, गायोना चारण गोपालीयो रे "**

**२. आहिरने आवडो शो मचको ? आपो मोगरडानी माळा रे**

**खटको चितमां शेनो पेठो ? जे अटको मारा व्हाला रे ।**

१ ( हे सावळ्या कृष्णा, सीमा पार कर. माझ्या राजा, गायी

राखणाऱ्या गोपाळा, वेड्या आतां (आसक्तीचें) वेड सोडून दे.

२.(गवळ्याला एवढी ऐट कशाला ? ती मोगऱ्याची माळ देऊन टाक. तुझ्या मनांत काय खटकते आहे ? माझ्या राजा ज्यासाठी तूं अडून बसला आहेस)

## आ) कवी प्रतिभा

अजूनपर्यंतच्या वरील आर्तभक्तीच्या काव्यांत, नरसिंहाची तेवढी आर्तता प्रतीत होत नाही. त्यांच्यावर आलेल्या संकटात प्रभूने कसे सहाय्य केले हे भौतिक प्रकाराने सांगताना वास्तविक त्यांनी 'अद्भुतरस' मूर्त करण्याचा प्रयत्न केला. त्या वर्णनांत, नरसिंहाची भव्यकल्पनाशक्ती चांगलीच गतिमय होते. क्वचित् वेळी, ते स्वतः तिथे हजर आहेत, अशा भूमिकेतून, ते वर्णन करतात. विवाह काव्याच्या आरंभी शरद्पोर्णिमेची रासक्रिडा रुजू करताना ते म्हणतात-

**१ शरदपूनम तणो दिवस आव्यो तिहा, रास-गरजादनो वेणू वाह्यो रुक्मिणी आदी देई सर्व टोळे मळी, नरसिह तिहा करताल साह्यो**

**२ पुरुष पुरुषातन् लीन थयुं माहरूं, सखीरूपे थयो मध्य गावा**
**देह दशा टळी, माहे रह्यो भळी, दूती यै मानिनीने मनावा.**

**३ हाव ने भाव रसभेदना प्राछव्या, अनुभवतां रस बस रे थातां**
**प्रेमे पितांबर आपियुं श्री हरि, रिझिया कृष्णजी ताळ वानां**

(शरद पोर्णिमेचा दिवस आला. रासक्रिडेचे वारे वाहु लागले. रुक्मिणी आदि राण्या सर्वामध्ये सामील झाल्या. नरसिंहानी तालावर टाळ्या वाजवल्या. (१) माझे पुरुषत्व तिथे लीन झाले. सखी रूपाने मी त्यांच्यात गाऊ लागलों. देहाची अवस्था संपली, त्यांच्यात मी मिसळून गेलो. ही रासक्रीडा सुंदरीला मानवणारी मध्यस्त (दुती) आहे. (२) हाव आणि भाव निरनिराळ्या रसभेदांचे विश्लेषण करूं लागले. त्या अनुभवानी कृष्ण भगवान् रसभरीत झाले. आणि मोठ्या प्रेमाने त्यांनी आपला पितांबर दिला. टाळ्यांच्या तालानी कृष्ण भगवान खूष झाले.

द्वारकेची कल्पना देतांना नरसिंह म्हणतात-

**रवि-शशी ज्योति तिहां नथी रे कोई भासती**
**माणि तणि ज्योति उद्‌धोत भासे**
**दधि-सुप्त अर्क ते कोण तिहां बापडा ?**
**कोटि रवि नरवमणी सिंहा प्रकाशे**

(तिथे सूर्यचंद्राची प्रभा भासतच नाही. रत्नांचा प्रकाश वीजेच्या लखलखाटासारखा असतो.

चंद्र-सूर्य बिचाऱ्यांचा तिथे काय पाड ? तिथं कोटी कोटी सूर्य आणि नक्षत्रमाळा प्रकाशत आहेत.

इथे अगदी स्पष्ट रितीने व्यक्तिरेकालंकार सादर केला आहे. २६ व्या पदात स्नान घातलेला, नटवलेला सजवलेला, हातांत नारळ दिलेला नवरामुलगा पित्याला नमस्कार करतो, तेव्हांचा प्रसंग, आणि २८ साव्या पदांत वऱ्हाडी मंडळीला दिलेला निरोप नरसिंह अत्यंत मनोवेधक शैलीत सांगतात. वडनगरांत पोचल्यावर नवऱ्यामुलाची मिरवणूक, मदन महेतांच्या दरवाजात आल्यावर दृष्ट काढणे, मधुपर्क देणे, अशा घटना हुबेहुब वर्णन करून नरसिंहानी मनोवेधक काव्य निर्माण केले आहे. मदन महेता आणि त्यांची पत्नी नससिंहाना, कृष्णरूपात, पत्नीला कमलारूपात नवऱ्यामुलाल प्रद्युम्नाच्या रूपात आणि नवऱ्यामुलीला रतिरूपात पहातात - असे वर्णन करून नरसिंहानी अद्भूतता रुजु केली आहे-

**मोरना पींछनो मुगट मणिमे धरयो**
**मककराकृत कुंडल श्रवणे झळके**
**कौस्तुभमणी श्रीवत्सलांछन धऱ्युं**
**वैजंती मोतीनी माळा लळके-१**
**पीतांबर पट कटिए कटी मेखला**
**कंचन-नेपुर चरणे खळके**
**कोटि-कंदर्प- लावण्य जोतां हरि**
**मुनिवर जोगी या मंन टळके -२**
**शंख ने चक्र गदा पद्म आयुध धऱ्यां**
**ब्रम्हण्यदेव छे नाम एनुं**
**कौटिक अर्क शशी ज्योती नखचंद्रिका,**
**कोटि ब्रम्हांड एक रोम जेनुं ३**
**म्हेतीनुं रूप दिठुं रे कमळा तणुं**
**वदन जोतां कोई नथी रे हांडे**
**इंद्र-इंद्राणी, ब्रम्हाणी रुद्राणी तिहां**
**निरखतां निरखतां हाथ ओडे -४**
**चार भुजा ने चपळ छे चातुरी**
**नवरात नवला तिहां सरस भावे**
**निमिष कटाक्षमा विश्र्व मोहित थयुं**
**वल्लभा वैकुंठनाथ कहावे -५**

**वर तणुं रूप प्रद्युम्ननुं निरखियुं**
**कुंवरीनु रुप ते रतिनुं दीवुं**
**दीव्यचक्षु नरनारीए निरखियो**
**रूप सुंदर लागे छे मीठुं ६**

१ डोक्यावर मोरपिसांचा मुगुट घातला आहे, कानांत मकर कुंडले झळकत आहेत. गळ्यात श्री वत्सलांछन कौस्तुभमणी आणि वैजयंती मोत्यांची माळ, रुळत आहे.

२. पितांबर नेसला आहे. कमरेत मेखला आहे. पायांतली सुवर्ण नुपुरें झुणझुणत आहेत. हरीचे कोटी मदनांचे लावण्य पाहून, मुनीवरांचे आणि जोग्यांचे मन थक्क होते.

३ शंख, चक्र, गदा, पद्म ही आयुधे घेतली आहेत. यांचे नाव श्रीकृष्ण (ब्रम्हण्यदेव) आहे. कोटी कोटी सूर्य आणि नक्षत्रमाळांचा प्रकाश, इथे एकवटला आहे. कोटी ब्रम्हांडे याला एक केसाप्रमाणे आहेत-

४ (माणेक) महेतींचे रुप लक्ष्मीप्रमाणे दिसते. तिचे मुख पाहणारा (आश्चर्याने) निश्चल होऊन जातो. इंद्र, इंद्राणी, ब्रम्हाणी, रुद्राणी तिला पाहून शरमल्या. हिला चार हस्त आहेत. ही चपळ आणि चतुर आहे. नवरात्र उत्सव हिला फार आवडतो. हिच्या एका क्षणाच्या कटाक्षाने विश्र्व मोहित झाले. ही वैकुंठनाथाची प्रिया म्हणून ओळखली जाते.

५ नवरदेवांत प्रद्युम्नाचे रूप दिसले. नवरी मुलीत रतींचे रूप दिसले. स्त्री-पुरुषांनी दिव्यचक्षुंनी पाहिलेले रूप सुंदर आणि गोड वाटले.

'मामेरां' काव्यात नरसिंहानी तीन ठिकाणी, अद्भुतरस मूर्त केला आहे १) नरसिहांनी आघोळीला गरम पाणी मागितले तर व्याह्यांनी उकळते पाणी दिले, त्यावेळी **'चैत्र सुद द्वादशी, मेघ घटा चडी, गडगडीने कुंडी गांहे पूर्व'** (चैत्र शुद्ध द्वादशीला ढग जमून आले आणि गडगडाट करीत घोंगावत पाऊस पडला) हे वर्णन २) श्रीकृष्ण आणि लक्ष्मी, दामोदर दोशीच्या दांपत्य रूपाने येतात, आणि मामेरुं पुरे करतात. **लक्ष्मी त्रुठां कृपा करी, छाब चाहिन सोनैया भरी** (लक्ष्मीने कृपा केली, भरपूर सोन्याने, थाळी भरली) हे वर्णन ३) हेमना ण्हाणिया ( ज्यावेळी 'हुंडी' तले शामलशा शेठ च्या रूपाने प्रभु द्वारकेच्या बाजारांत आगमन करतात. इथे स्वभावोक्तिवर भर आहे. ते वर्णन -

**वणिक थ्यो विठलो, शेट शोभे भाळो**
**वाणोतर आठ लीधां छे साथे**
**कुंडल करणे, ने चरणे छे मोजडी**
**वींटी ने वेलियां पहेर्‍यां हाथे**

**सामळुं अगं ते अतिं घणुं ओपतुं**
**शोभती लटवती चाल चाले.**

(विठ्ठल वाणी बनला. मोठ्ठा शेठ शोभतो आहे. दुसरे आठ वाणी बरोबर घेतले. कानांत कुंडले आहेत. पायात मोजडी आहे. हातांत आंगठी आणि सलकडी घातली आहेत. सावळे शरीर अत्यंत तेजस्वी दिसत आहे. हा आकर्षक ढंगाने चालत आहे)

आर्तभक्तीने ओतप्रोत भरलेल्या 'हार' काव्यांतल्या प्रसंगात, अद्भुतरस आणण्याचा काही विषेश प्रयत्न नाही. केवळ केशळे कंठथी हार करियो वडो, प्रेमे आरोप्यो नर सै ए-ग्रीवा (केशवाने गळ्यातला हार उतरला आणि• प्रेमाने नरसिंहाच्या गळ्यात घातला) एवढेच सुचवण्यात आले आहे.

परंतु 'झारी' काव्यांत केलेले मोहिनी स्वरूपाचे चित्रण नरसिंहाच्या कवी प्रतिभेचा एक सुचक नमुना आहे. तसाच 'स्वभावोक्ती' चा पण हा रोचक नमुना म्हणता येईल.

**१. आ जोने कोई उभी से आळास मोडे**
**बाहे बाजुबंद बेरख्रा पहोंची, मनडुं मोह्युं छे एने मोढे**
**झांजर झमके ने विंधुआ टगके, हिंडे छे बांके अंबोडे -१**
**सोवर्ण झारी ते अति से समारी, मांहे नीर गंगोदक होडे**
**नरसैयाने पाणि पावाने हरिजी पधाऱ्या कोडे -२**
**२) मोह्या मोह्या मुनिवर राया रे, गोरी तारे गाजुडे**
**रूप स्वरूप कह्युं नव जाये, गे तो जाणी छे ईश्वरी मायारे**
**रुमझुम रुमझुम नुपुर वागे, पावले ते चीर अति चांपेरे**
**घुंगटमा मुख एणे तेरे शोभे, मोटां मुनीजननां मन कापें रे -२**
**गोरु शु वदन ने गळस्थळ झळके, उपर दामणी झळके रे**
**साळुदानी कोर एणी पेर शोभे, जाणे गगनमां वीज चळके रे**
**वशीकरण वेणी तम्यो किहां गूथांवी सुंदरी शणगरवाळी रे ?**
**आ चोळी तम्यो किहा शिवडावी, जेने मोही वज्रनारी रे ? -४**

चंचल दृष्टे चो दश निहाळे, मांहे मदननो चाळो रे, नरसैयाऱ्या स्वामी जोवा सरीखड़ो कोई ए सुंदरी नु वदन निहाळे.

**३) आ शो चतुरांना चिंतनो चाळो रे ! एने कोई जिहाळो रे**
**ब्रम्हाय तो नथी घडी भामिनी, ए तो आपे बनीने आवी रे**
**त्रणे लोकनुं तेज तारुणी ए तो छब्बी छबीले बनावी रे,**
**घड़्यु घरेणु अेणे रे हाथे, हाथे भरी छे चोळी रे**

**साकुडे भात नव नारी कुंजरनी, कसूंबाना रंगमां बोली रे -**

१ (ही पहा ना, आळोखो पिळोखे देत कुणी उभी आहे. हिच्या दंडावर बाजुबंद आहेत, हातात कांकणे आणि पोची आहे. हिच्या मुखाकडे पाहुन माझे मन अगदी मोहित झाले आहे. हिचे पैंजण झुणझुणत आहेत आणि जोडवी छुमछुम करीत आहेत. सैल आंबाडा घालून ही चालते आहे. २) हिने सुवर्णझारी खुप सजवली आहे. त्यात गंगोदक झाकले आहे. नरसिंहाला पाणी देण्यासाठी, मोठ्या लाडाने श्रीकृष्ण आले आहेत. ३)

हे सुदंरी तुझ्या सौंदर्यांच्या प्रसिद्धीने मोठेमोठे मुनी, अत्यंत मोहित झाले, तुझ्या रूपाने वर्णन शब्दांत सांगता येत नाही. मला तर वाटते (तूं) ईश्वरी मायाच आहेस. तुझ्या पायांतली नूपुरे रुणझुण रुणझुण वाजताहेत. तुझ्या पावलांखाली तुझे वस्त्र दबत आहे. हिचा घुंगटांतला चेहरा, स्व-सौदर्यानेच शोभतो आहे. आणि मोठ्यामोठ्या मुनीजनांचे मन विचलित होत आहे. २) गोरापान चेहरा आणि गळा काय झळकतो आहे, त्यांत वर बिंदी चमचमते आहे. साडीचा काठ हिच्या पावलांवर, ढगांत वीज चमकावी तसा शोभतो आहे. ३) प्रसाधन करणाऱ्या हे सुंदरी वशीकरण करणारी ही वेणी तूं घातलीस तरी कुठे ? वज्रनारीला मोहित करील, अशी ही चोळी तूं कुठे शिवून घेतली ? ४) चंचल दृष्टीने चारी दिशांकडे पहात आहे. त्यांत मदनाचा चाळा आहे. नरसिंहाच्या स्वामीसारखा (कृष्णाप्रमाणे) हिचा सुंदर चेहरा कुणीतरी पहा ना रे -५

३) कुणीतरी पहा तर खरा काय हा चतुर मनाचा चाळा ? ही सुंदर स्त्री ब्रम्हदेवाने घडवलेली नाही, ही स्वतः स्वतःला निर्माण करून आली आहे. या तरुणींत तिन्ही लोकांचे तेज आहे. त्या कृष्णाने ही मूर्ती बनवली. कृष्णाने आपल्या हातांनी हिचे दागिने घडविले. आपल्या हाताने हिच्या चोळीवर भरतकाम केले. या गज (गामिनी) स्त्रीची नव्या प्रकारची साडी कुसुंबी रंगात रंगविली आहे.

वास्तविक घुंघट काढून, हातात झारी घेऊन येणारी स्त्री नरसिंहाची सून रतनबाई होती. तिला पाहून तिच्यांत आपल्याला मोहिनीस्वरूपाचें दर्शन होत आहे, अशा तन्मयतेने त्यानी वरील काव्यचित्र रेखाटले.

खरे पाहिले तर त्यांची आत्मचरित्रपर काव्येच त्याच्या उत्कट कविप्रतिभेची द्योतक आहेत. लहानपणापासून नरसिंह भक्तिरंगात रंगलेले होते. सांसारिक कार्यांच्या सफलतेची त्याची शरणांगत भक्तांची दृढ भुमिका, हीच होती. त्यांचे सांसारिक अनुभव त्यांनी काव्यरूपांत नटवले आणि फलस्वरूप त्यांच्या कवीप्रतिभेचा महान साक्षात्कार झाला.

नरसिंहावर आलेल्या आपत्तीत, कोणत्या ना कोणत्या प्रकारे त्यांच्या मित्रांनी किंवा त्यांच्या चहात्यांनी त्याना मदत केली. अनन्यशरणागतीची त्यांची मनोवृत्ती, त्या सर्व मदतकार्यांत,

प्रभूची करणीच मानू लागली, कवीहृदयाच्या नरसिंहानी ते ते प्रसंग चैतन्यमय बनवले आणि त्यांत भगवंताचा साक्षात्कार मूर्त केला. खरे म्हणजे अद्भुतरस निर्माण करण्याची त्यांची ही शक्तीच म्हटली पाहिजे. त्या त्या प्रसंगानुसार त्यांनी कितीतरी, अनुरूप पदे रचून ठेवली असतील आणि नंतर स्वस्थपणाने त्यांनी त्या सर्व रचना व्यवस्थित केल्या असतील. प्रसंगानुरूप पद्यरचना त्यांनी नंतर संकलित केल्या असतील. विवाह काव्यांत भविष्य अर्थानेंच पुढे होणारा प्रसंग 'मामेरू' लिहिला आहे. त्याचे कारण हेच आहे. 'झारी' काव्यांतले चौथे पद नंतर लिहिले गेले असण्याची शक्यता आहे. त्याचे कारण हेंच असले पाहिजे.

# ३ आख्यान मूलक काव्ये.

नरसिंहानी हाताळलेला दुसरा प्रकार म्हणजे 'आख्यान मूलक वर्णन काव्य', हा होय.या प्रकारांत १) सुदामाचरित (सुदामाचरित्र) २) दाणलीला (दानवसुली) ३) चातुरीओ (चातुर्यगीतें) ४) रासशरदना पद (रासक्रीडेचीं गाणी) ५) श्रीकृष्णजन्मसभा ना पद ( कृष्णजन्माची गाणी) ६) श्री. कृष्णजन्म पद (श्री कृष्णजन्मोत्सवाची पदें ७) बाललीनां पद (बाललीलेची पदें) ८) वसंताना पद (वसंत ऋतुची पदें) आणि ९) हिंडोळाना पद (झोपाळयाची पदें) सर्व सामान्यपणे या रचनामध्ये वर्णनात्मक कथा भाग आलेला दिसतो. या रचनांचा आख्यान प्रकारांत समावेश करण्यांचे कारण एवढेच की यांत मुख्यतः भागवतपुराणातील कथाभाग पद्यरूप करण्यांत आला आहे. असे असुनही यांतील 'चातुरी' च्या पदांपासून 'हिंडोळाना पद' पर्यंतच्या काव्यसाहित्यात आत्मलक्षी कविता आणि भावगीतें विपुल प्रमाणात दिसतात. मुख्यतः आता, आरण्यान दृष्टीने थोडा विचार करू-

**१) सुदामचरीत्र-**

झोपाळयावरील गीतांच्या साच्यांतली, 'सुदामानां परभातियां' (सुदाम्याची प्रभातगीते) म्हणून ओळखली जाणारी नरसिंहाची ९ पदे आहेत. त्यांत भागवतातील दशम स्कंधातील, सुदामावरच्या प्रसंगाची कथा, वर्णन केली आहे. ईश्वर अनन्य भक्तांना, त्यांच्या अपेक्षेपेक्षाही जास्त देतो हा भक्तीमार्गाचा सिद्धांत आहे. त्यावरच या छोट्याशा कथेची उभारणी केली आहे. श्री कृष्णाचा बालसहाध्यायी सुदामा, अयाचक वृत्तीचा असल्यामुळे, त्याची परिस्थिती फार हलाखीची झाली होती. अशा परिस्थितीत राजा श्री कृष्ण सहाय्यरूप होईल, अशा हेतुनीं सुदामाची पत्नी, त्याला श्री कृष्णाकडे पाठवते. नरसिंहानी पहिल्याच पदात, घरच्या गरीब परिस्थितीचे चित्र सुदाम्याच्या पत्नीच्या मुखाने उभे केले आहे.

**घेर बालक सहु दुखः पागे बहु**
**अन्न ने वस्अथी रहे छे उणा**
**निरधन सरजियां पुण्य, कीधा बिना**

**कर्मना दोष ते आवी पुण्या, जदुपती -**

(घरातली मुले अन्नवस्त्राअभावी खूप दुखः भोगताहेत. पुण्य नाही, म्हणून निर्धन जन्माला आली. श्रीकृष्ण येऊन कर्मदोष नाहीसे करील.)

प्रभुपाशी कांही मागायला सुदामाची पत्नी सांगत नाही. परंतु आपल्या इच्छा ओळखूनच प्रभु आपले मनोरथ पूर्ण करील ही भावना व्यक्त करते आहे. याशिवाय, द्वारकेला जाण्यात कसा फायदा आहे तेही समजावते आहे. गोमती नदीत स्नान होईल आणि कोटी कोटी पातके नाश पावतील.

तिसऱ्या पदात कृष्णाकडे जायला सुदामाला कां संकोच वाटतो आहे ते नरसिंह त्याच्याच तोंडून वदवीत आहेत. श्रीकृष्णाला, 'सुदाम ब्राम्हणदेवता' आहे हे समजावते. पांघरायला काही नाही, भेट म्हणून द्यायला कांही नाही, असे सुदामा म्हणतो, तेव्हा त्याची पत्नी त्याला थोडे 'पोहे' देते. द्वारकेच्या वाटेने जाणाऱ्या सुदाम्याच्या निर्लोभी मनोवृत्तीचे आकर्षक शब्दचित्र नरसिंह उभे करीत आहेत.

**चालियो वाटमा, ज्ञानीना घाटनां, मित्र मोहन तणुं नाम लेतो,**
**धन्य ए नार अवतार सफल करयो, कृष्ण हे कृष्ण, मुख एम कहेतो**
**मायकुं मृत्यु प्रमाण छे प्रणीने, लोभ किधे, त्याहां प्रित तूटे,**
**कह्युं मे अबला, सुखे बेसी रहो, मांगतां तो बधो मर्म छुटे,**
**मागियुं गे नथी, शुं मुखे कहुं कथी ? भोगवुं कर्म जे भाग्य लाव्यो**
**श्री पतिनाथे मने रंक सरजावियो, एम करतो द्विज द्वारा आव्यो**

(ज्ञानी लोकांच्या मळलेल्या वाटेने, मित्र मोहनाचे नाव घेत सुदामा चालला आहे. धन्य माझी स्त्री, माझा जन्म सफल केला, (मला कृष्णदर्शनाला पाठवून) मुखाने कृष्ण हे कृष्ण म्हणतो आहे. याचना करणे हे प्राण्याला मृत्यूसमान आहे. जिथे लोभ होतो, तिथे प्रेम नष्ट होते. मी म्हटले, माझ्या स्त्रीला हे अबले, सुखाने स्वस्थ रहा. याचना केली की गौण्य उघड होते. मी कांही मागितले नाही. माझ्या मुखाने मी काय सांगणार ? भाग्याने जो कर्मभोग आला तो भोगावा. भगवंताने मला दरिद्री म्हणून जन्माला घातले - असे विचार करीत (सुदामा) ब्राह्मण दारी आला.)

यानंतरच्या पदांत, दोघा मित्रांची भेट, बाळपणीच्या निघालेल्या आठवणी, एखाद्या राजाप्रमाणे, सुदाम्याला मिळालेला मान सन्मान, बरोबर आणलेले थोडेसे पोहे, 'भेट' म्हणून द्यायला, सुदामाला वाटलेला संकोच, झटापट करून हिसकावून घेतलेली ती पोह्यांची भेट आणि बदल्यात कृष्णाने सुदाम्याला ठाऊक नसलेले - इंद्र कुबेरापेक्षांही वरचढ दिलेले वैभव,

सुदाम्याने स्वीकारलेला सन्मान, वगैरेची वर्णने आहेत.

**विप्र चाल्यो वळी, कृष्ण साथे मळी**
**चित्तमा शोची विचार करतो**
**आप्यु तो कई नथी, गाठ जाणी नही**
**ते तणो शोच हृदये ज धरतो -**

(कृष्णाला भेटून ब्राह्मण परत फिरला. मनात खेद करीत, विचार करीत होता. कृष्णाने दिले तर कांहीच नाही. त्याला अडचण समजलीच नाही. त्याचाच खेद, त्याच्या मनांत येत राहिला.)

सुदाम्याला निरोप देताना, त्याचा नेसलेला पितांबर पण प्रभूने घेतला, सुदाम्याच्या तोंडून, त्याला ती फसवणूक वाटली असे नरसिंह वदवतात. तरीपण तो साधू मनाचा आहे. आपल्याला प्रभूने मानाने वागवले याची तो मनःपूर्वक आठवण करतो. रंक बेसाडियो कनकमाची '(सुवर्ण पलंगावर रंकाला बसवले )' आणि प्रभुला धन्यवाद देतो. घरी येऊन पहातो तो -

**'रत्न जडित मणि भवत् शोभा घणी**
**देव शुं द्वारिका आंही ला व्यो ?**

(रत्न जडित माणकांनी घराची शोभा फारच दिसते आहे. प्रभूने द्वारकानगरी काय, इथे आणली की काय ? नरसिंह इथे अद्भुतरसाचा छोटासा नमुना देऊन, आपली काव्यप्रतिभा सरळ शब्दांत सार्थक करीत आहेत.

**कनकनी भुमी ने रत्नना खांबला -**
**सुरजणी ज्योति उद्यात दिसे**
**खान ने पान विहार स्थानक घणां**
**कामिनी निरखतां काम हीसे -**
**सप्त नव वरसनी दीठी त्यां सुंदरी**
**नारी नव जोबना बहु रूपाळी**
**सोळ शणगार ते अंग सुंदर धन्या**
**देव विमानथी रह्या निहाळी -**
**सहस्त्र दासी मळी, दिशे विंटो वळी**
**कामणी कंथनी पास आवी**

(सुवर्णाची भूमी आणि रत्नांचे खांब आहेत. सूर्याची ज्योति लावली आहे. खाण्यापिण्याची अनेक ठिकाणे आहेत. कामिनीला पाहून काम खुष आहे. (सुदामाची पत्नी) १६ वर्षाची सुंदरी दिसते आहे. नवयौवना आणि रूपवान आहे. अंग सोळा शृंगारांनी विलसले आहे. विमानांतून देवगण निरखून पहात आहेत. हजारों दासींनी वेढलेली ती कामिनी, पतीच्या दिशेने, पतीपाशी

(सुदाम्यापाशी) आली)

कवीने या काव्यांत सुदामा, त्याची पत्नी आणि श्रीकृष्ण या तिघांही पात्रांचे अनुरूप वर्णन करून आपल्या काव्यशक्तीचा प्रभाव दाखवला आहे.

**२) दाणलीला ( जकात म्हणून दही दुधाची वसुली )**

मथुरेला ताक विकायला गौळणी जात. बरोबर सोबती घेऊन कृष्ण त्यांना वाटेत अडवी. जबरदस्ती करून, त्यांचे ताक 'जकात' म्हणून लुटायचा, कृष्णाचा परिपाठ चाले. काव्याच्या उत्तर भागांत त्या वेळचा राधाकृष्ण संवाद, ३९ ओव्यात, दोहऱ्यांच्या प्रकाराने, वर्णन केला आहे. हा प्रसंग फार प्रसिद्ध आहे. 'मी जकात (दाण) देणार नाही' म्हणणाऱ्या राधेचे वर्णन काव्यदृष्टीने, लक्षवेधी आहे.

**मुख भर्यु एनुं मोतीए जोरे अपर वासिक वेख**
**सुंदर सोहिये राखडी, नयने काजळ रेख.**
**चुडी मुद्रिका रे बेरखी, मुखे चावती तंबोळ**
**वृंदावनमां संचर्या जी रे, शजीने शणगार सीळ.**

आणि श्रीकृष्णाचें पण असे स्वभावोक्तिपूर्ण चित्र

**मोरमुकुट वाहाले शिर धर्यो, मकराकृत कुंडल कर्ण**
**पितांबर वाहाले पेहेरियुं, जाणे उपमा मेघ ज वर्ण**
**केसरना टिलक शिर धर्या, पेहरयो गळे गुंजानो हार**
**पालव साह्यो पितांबरे, दाण आप्य ने जा, ना नार -**

( मोत्यांनी हिचे तोंड भरले आहे. दांत मोत्यासारखे आहेत आणि न संपणारा सुवास आहे, 'राखी' सुंदर दिसते आहे आणि डोळ्यांत काजळाची रेखा आहे. बांगडी, आंगठी आणि कांकणे आहेत - पान खाते आहे. वृंदावनात प्रत्यक्ष १६ शृंगार, सजून अवतरला आहे.)

**कृष्णाचे वर्णन**

(प्रियाने डोक्यावर मोरमुगुट घातला आहे, कानांत मकराकृती कुंडले आहेत. मेघवर्णाची उपमा देता येईल, असा पितांबर कृष्ण नेसले आहेत. केशरी टीळा कपाळावर लावला आहे. गळ्यांत गुंजांची माळ आहे. पितांबराचा पदर पसरून म्हणतो हे स्त्रीये दान दे आणि जा.

संपूर्ण काव्याचा शेवटी राधा म्हणते, 'वाजव ना मधूर मुरली ' — आणि कृष्णाने मुरली वाजवली - राधेने क्रीडा केली शांत झाला आहे.

**३) चातुरीओ ( चातुर्य - गीते )**

संस्कृत साहित्यांत जयदेवांच्या गीतगोविंदचे जे स्थान आहे,ते स्थान गुजराथी साहित्यांत नरसिंहाचे 'चातुरीआ काव्य' घेऊ शकेल, अशी त्याची कुवत आहे. त्यांच्या काव्यसंग्रहांत 'चातुरी छत्रीशी' आंणि 'चातुरी षोडशी' अशी ५२ पदे - अगर त्यांच्या 'झुमका' मुद्रित झाला होता. हस्तलिखितांच्या मदतीने त्यांचे संपादन झाले आणि ते 'चातुरीपचीशी' म्हणून प्रसिद्ध झाले. 'चातुरीओ' काव्याचा अभ्यास केला तर आढळून येते की वरील ५२ चातुरी गीतांत या 'चातुरीपचीसी' चा अंतर्भाव आहे. त्यांतपण 'पचीसी' ची १ ते १० चातुरीगीतें. एका संलग्न क्रमांने आहेत. बाकीची चातुरी गीते, नरसिंहानी वेगवेगळ्या प्रसंगी, स्वतंत्र, स्वतंत्र अशी लिहिली असावीत आणि नंतर ती संकलित झाली आसावी, असा तर्क आहे. राधा कृष्णाच्या विहारांत कृष्णाची चतुराई मुख्यतः वर्णन केली असल्यामुळे त्याना 'चातुरी' असे नाव देण्यात आले. **"आजे मे एवी चातुरी जाणी जी, मारग थई बेठा दाणीजी"** ( आज मी याची चतुराई ओळखली. वाटेवर दाणीजी (जकात वसुल करणारा) होऊन बसला आहे) आणि **"रूडी पेर जाणो नहि, तो जुओ गोपाळनी"** चातुरी .(सरळ समजलं नाहीतर ती गोपाळांची चातुराईच आहे, असं समजा )

श्री कृष्णलीलेचे निरनिराळे प्रसंग , निरनिराळ्या चातुरी गीतांत, निरनिराळ्या शैलीत संगीतबद्ध केले आहेत. 'चातुरीपचीसी' तील संलग १० पदे, गीतगोविंद च्या धर्तिवर आहेत. राधाकृष्ण विरह, आणि सखीच्या मध्यस्थीने झालेले मीलन हाच यातील, वर्णनाचा विषय आहे. इथे सखी म्हणून ललीताची नियुक्ती आहे. 'चातुरी पचीसी' च्या प्रथम पदांत, राधा विरहाने कृष्ण व्याकुळ झाला आहे, आणि ते पाहून सखी ललिता, मध्यस्थाची भूमिका घेऊन, कृष्णाच्या राधाविषयक भावना, चाळवीत आहे. विप्रलंभ शृगाराचा हा सूचक नमुना आहे.

**सुनोजी, सलनडा रे रेण रास रम्या ने भरो छो तम्यो ने तमे नेण**
**शुं दुखः छे रे तम्हने नाथ, वल्हहा कहिने मुझने वात**
**(ढाळ) वात कहोने वल्हहा, कां थई सह्यो छो उदास ?**
**सियाने ते काजे शापल, मुको छो मुख निसास ?**
**वदन ताहरुं वाहलमा, करमाणुं कहने स्ये माटे ?**
**कपाले कर का दई रह्या ? उपनो स्योरे उचार ?**
**माहवजी ताहरुं वदन जोतां जनम दुकृत जाई**
**नायजी, ताहरुं नाम लेतां पतीत पावन थाई**

(ऐका प्रिय कृष्ण, चांगली रासक्रीडा केली आणि आतां डोळे भरले आहेत. प्रिय कृष्णा, मला सांगा ना काय गोष्ट आहे ती, नाथ तुम्हाला कोणते दुखः आहे ? सांगा ना कृष्ण, का एवढे

उदास होता आहा ? श्याम, एवढे उसासे टाकायला कारण तरी काय आहे ? प्रिय कृष्णा, तुमचे तोंड कशासाठी, एवढे उतरून गेले आहे ? कपाळास हात लावून कां बसता आहांत ? अशी काय पंचाइत झाली आहे ? माधवा, तुमचे दर्शन झाले तर जन्माचीं पापें नष्ट होतात. कृष्णनाथ तुमचे नामस्मरण करून पापी पवित्र होतो.)

हे सारे सांगून, तुझी शुद्ध बुद्ध हरवून जावी, अशी ही कोणाची कर्तबगारी आहे ? असा प्रश्न करून रहस्य काढून घ्यायचा प्रयत्न करते. दुसऱ्या चातुरी गीतांत 'ही राधा आहे'. असं सांगुन आपले हृदय हिने कस चोरलें आहे. ते कृष्ण सांगतात आणि या 'मानिनिला' भेटता येईल असा कांहीतरी मार्ग काढ' अशी विनंती कृष्ण, मध्यस्थ ललीताला करतात. तिसऱ्या चातुरी गीतांत ललीता तसें आश्वासन देते आणि आपल्या वस्त्राने त्यांचे डोळे पुसते.

आणि म्हणते '**सोक निवारी सुख करुं, तो जाणजो खरी दूती**' (तुझे दुखः नाहीसे करून मी तुला सुखी केले, तरच मला खरी 'मध्यस्थ' इती समज) लगेच ललीता राधेच्या घराकजडे मध्यस्थाचे कार्य (दूती कार्य) करायला निघाते. ललिता राधेकडे जाते, तो काय ? राधापण विरह व्यथेने झुरते आहे, असं तिला दिसते. कृष्णाबद्दलची तिची आतुरता ललिता कळसाला पोहचवते. पांचव्या चातुरी गीतांत, नायकाला भेटायला जाण्यासाठी, नायिका साजशृंगार करते, त्याची उद्दीपिक तयारी, पहा-

**" हरख मनमां धरी घणो गरदन करयं तेणी वार**
**चुवाचंदन, अगर, केसर, सुगंध लईने अपार**
**चीर चंपक साडी पटोळी ओपतो पहेरी अंग**
**घुंघट मांहे नचावती नारी ते नयन कुरंग**
**सीर-फुली राखडी, वोणीई वणगो सेख**
**नलवट सोहे टीलडी, नयणे ते काजलेख**
**निर्मल मोती नाकमां श्रवणे ते पेहेरी झाल**
**अरुण-पाई ओपतां, गाजवुं ते सोहे गाल**
**मोतीसर झरमर कंठे उर एकावल हार**
**चोळी ते पेहेरी कसमसी करकंकण झमकार**
**चुडलो चुडी सरलियां वींटी ने दरपण पाण**
**कंकण सुबद्ध सुहामणा मुख-स्युं करुं रे वखाण ?**
**चरण नेपूर घुघरी वीछिंया अणवट सोहे**
**नखशिख जोतां सुंदरी मुनीवरना मन मोहे**

(अत्यंत आनंदित होउन तिने, चूवाचंदन उद आणि केशर घेऊन आपलें अंग मर्दन केले-

अंगाला चोळले)

(चंपक रंगाची पटोळी साडी ती नेसली. त्या तिच्या वस्त्रातून तिचें शरीर-तेज नुसते ओसंडून जात होते. तिच्या घुंघटातून तिचे नयन-मृग नाचत होते. शिरीष फुलांची तिने राखी बांधली होती. केसांची मोठी वेणी रुळत होती. कपाळावर टिकली शोभत होती, आणि डोळ्यांत काजळाची रेख, पांढरे मोती, नाकांत 'नथनी' झाले होते, कानांत झुमके होते. अरुण लालिमा गालावर तेज ओतीत होता. मोत्यांचा सर गळ्यात चमकत होता आणि छातीवर एकेरी मणिहार होता. चोळी अंगाला घट्ट बसली होती आणि हातातले कंकण आवाज करीत होते. चुडे आणि बांगड्या सैलसर घातल्या होत्या. आरशाची काच बसवलेली अंगठी घातली होती. कांकणाचा आवाज मधूर येत होता, त्याचे वर्णन मी माझ्या तोंडाने काय करावे )

पायातले नुपूर , आणि जोडव्यांचे घुंघुर कमालीचे शोभत आहेत.

या सुंदरीचे नखशिखान्त दर्शन मुनिवरांचे मन मोहून टाकीत आहे

**'हंस गमनी गण-गती कटि केसरीनो लंक**

**उर अंबुज उपतां, मुख जाणिये मंचक -**

(ही हंसासारखी कमनीय चाल असणारी, गजगती आहे. हिची कंबर सिंहासारखी कमनीय आहे. हिच्या वक्षस्थळाची कमळे उमलतात, तेव्हा हिचा चेहरा, चंद्रासारखा दिसतो)

आणि हे प्रसाधन, नायिकेंचे भावदर्शन करते, ते वर्णन

**'मुखडे ते मधुर बोलती, अलवे - स्युं मोडे अंग**

**पद्मनीने प्रेम वाध्यो, मलवा ते श्रीरंग '**

(ही मुखाने गोड बोलते किती कलापूर्ण आहे हिची हालचाल. या सुंदरीला प्रितीची बाधा झाली आहे. श्रीरंगाला भेटायला ही फार उत्सुक आहे)

६ व्या चातुरीत हाच अनुभव अलंकारीकरित्या व्यक्त आहे.

**' पूरवदिशथी प्रगटियों अने सोळ कळानो चंद्र**

**नयणे ते निरखी नार ने, सूकवा ते लागो इंद**

**मअंकी मन झांखो थयो अने ससी तेणी वारि,**

**कलंकी केम थई तोले ? तारूणी तेज अपार**

(१६ कलांनी परिपूर्ण चंद्र पूर्वदिशेने प्रगट झाला. या नारीला, डोळ्यांनी पाहून, तो कलेकलेने सुकत चालला . चंद्रांचे मन विषण्ण झाले आणि त्याने आपली किरणें निस्तेज करून टाकली. त्या तरुणीचें सौदर्य इतके अपार की तिच्याशी चंद्राची तुलना कशी होणार ? चंद्र

तर कलंकित आहे.

व्यतिरेक अलंकाराने, नायिकेचे सौदर्य वर्णन करायचा कवीचा प्रयत्न आहे. ८-९-१० 'चातुरी' गीते मीलना नंतरचा शृंगार रेखाटत आहेत. या गीतांत क्वचित् मधेच कवी व्यक्तिशः भाग घेऊन आत्मलक्षी पद्धतीने वर्णन करीत आहे.

**" पासे रहीने पेखियो अनुभवे रस जेह**
**जेहवी लीला नयणे दीठी, मे मुख गायो तेह (१)**
**दीवी माहेर करे दीधी, नररैया निध जोई**
**विलास गोकुळ नाथनो भूतने गाजे सोई (२)**
**वळी अधडी करी करुणा आपियां करताळ**
**हुं सुखे लागो गान करना, प्रसन्न थया गोपाळ (३)**
**भामनी मोहे भळई गयो जेम सागर मोहे रतन**
**माहारस मांहे झीलीयो प्रभुजी थया रे प्रसन्न (४)**
**भाव जणावे नयनमां ते उपजे मनमांही**
**माननी रूपी ते मनावो हुं दूती थईते तांहि (५)**

(जवळ राहून ज्याचा रस मी अनुभवून पाहिला आणि जी क्रीडा मी डोळ्यांनी पाहिली, तीच मी वर्णन करतों आहे (२) नरसिंहानी दिवटी धरली आणि भूतलावर सर्व प्रसिद्ध असलेला गोकुळनाथा (कृष्ण) चा विलास स्वतःच्या डोळ्यांनी पाहिला (३) हाताने ताल दिला तर माझ्यावर पुरी करुणा केलीच नाही. मी मजेने गाणे म्हणूं लागलो. तर गोपाळ प्रसन्न झाले (४) गोपीच्या मध्ये मी मिसळून गेलो, जसे समुद्रांत रत्न, आणि महारास क्रीडेंत मी सामावलो तेव्हा प्रभूजी प्रसन्न झाले (५) मनांत येणारे भाव नेत्रांत दाखवले. मानिनी रुसली, त्यावेळी, तिची समजूत घालायला मी दुती (मध्यस्थ) झालो.)

याच चातुरी गीतांत, शंकराच्या कृपेने दिव्यचक्षू मिळाले आणि भावजयीच्या कठोर बोलण्याचे निमित्त होऊन, नरसिंह श्री कृष्णाचे गान (काव्य) करूं लागले - ही हकिकत दिली आहे.

**रास शरदनां पदो - राससहस्रपदी**

**(शरद पौर्णिमेंची, रास क्रीडा पदें)**

नरसिंहाच्या नावावर खपवलेल्या गोविंदगमन काव्यांत '**ते नरसईये गाई रे विविध विलासमांरे, नाम तेणुं सहस्रपदनो रास** (विविध विलासांचीं नरसिंहानी काव्यें लिहिलीं, त्यांचे नाव सहस्रपदांची सास क्रिडा.)

या सहस्रपदांचा निर्देश स्वीकारून स्व. ईच्छाराम सूर्यराम देसाई नीं, राससहस्रपदी या नावाने. या गीतांचा काव्यसंग्रह छापला होता. त्यांत १८९ पदें आहेत; त्यापैकीं भागवतांतील रासपंचाध्यायी च्या क्रमाने केवळ शरदपौर्णिमेची क्रीडागीते (रास शरदना पदो ) त्यांच्याशी मिळती जुळतीं काही स्वतंत्र पदे तसेच इतरही तेच भाव असणारी पदें एकत्र करून. मी (लेखक) रास सहस्रपदीनो समुद्धार या नावाने काव्यसंग्रह प्रसिद्ध केला. या काव्यसंग्रहांत ११३ पदांचा समावेश होऊं शकला . याचे वास्तविक स्वरूप सर्व कथाप्रकारांचे वर्णन असेंच आहे. यांत साधारण रासक्रीडा, कृष्णविरह, गोपींचा विरह, विलाप, आणि शेवटी श्रीकृष्ण मीलनानंतर महारास, इतकी सलग कथा आहे. यांत भागवतपुराणांतल्या कितीतरीं श्लोकांचा सरळ, अगर भावात्मक अनुवाद असणारी, पदें आहेत. तशी एकदम स्वतंत्र पण काहीं पदे आहेत.

**'मधराते मधुरी मारे वालेजीए वांसलडी वाही रे.**
**कामिनी काम गेहेली थई रे शहु वृंदावन आई रे - १**
**शाशु - नणंदनी लाज तजीने भूषण अंगे सजियांरे**
**रजनी रास रमे वा कारण जई जादवने भाजिया रे - २**
**नयणभरी निररण्यो नंदनंदन अबला आनंद पायीरे**
**नरसियाच्यो स्वामी वृंदावन केल करे महाकामी रे**

(प्रिय कृष्णाने मध्यरात्री अत्यंत मधुर बासरी वाजवली. काम-विव्हल होऊन सगळ्या कामिनी वृंदावनांत आल्या. सासू नणंदाची मर्यादा सोडून त्यांनी अंगावर दागदागिने घातले आणि नटून थटून रात्रीची रासक्रीडा करण्यासाठी यादवांची प्रार्थना केली (२) नंदनंदनाला डोळे भरुन पाहिलें आणि त्या अबला खुष झाल्या. नरसिंहाचा स्वामी (श्रीकृष्ण) महाकामी, वृंदावनांत क्रीडा करतो )

चातुरी काव्यांत कुठेकुठे कवीने स्वतःचे सांनिध्य वर्णन केले आहे. तसेंच खालील काव्यांत, आढळते-

**झांझरनो झणकर मनोहर रंग जाम्युं म्हाझम रचणी रे**
**त्रिकमनी ताली दिया तरुणी चतुर-चपल-मृगनयनी रे - ?**
**विठ्ठलने वश करना कारुण्य नाना भाव धरंती रे ,**
**नयने-कटाक्षे मोह उपजावें मुखि नरकला करती रे -२**
**गोपी मेल करे. गोविंदस्यु, तन-मन-धन सौं सीपी रे**
**भणि नरसैयो, तृप्ती न पामुं, जोतो गोव्यंद गोपी रे -३**

(पैंजणाचा झणकार मन मोहून टाकणारा आहे. कृष्णाने रचलेल्या रासक्रीडेंत काय रंग जमला आहे. चतुर ,चपल, मृगनयनी तरुणींनी, कृष्णाला टाळ्यांचा ताल दिला. विठ्ठलाला

आपलासा करण्यासाठी नानातऱ्हेचें भावदर्शन करताहेत. नयन कटाक्षांनी मोहवित आहेत. आणि मुखाने मंदहास्य करीत आहेत. गोपींनी, एकत्र जमून, गोविंदाला तनमनधन अर्पण केले. नरसिंह म्हणतात गोविंद आणि गोपी पाहून मन तृप्त होतच नाही.)

**कवीची खरी तन्मयता खालील पदांत पहायला मिळते -**

**दिवेटिऊ रे दिवेटिऊं नरसैं हरि केरो दीवेटीयो**
**पुरुष प्रीत धरी मन माहे तो रसनाए रसभरियो**
**जवती जुथ जीवन रंगराती मंडलमां महालंती रे**
**इक नाचे इक तान मिळावे मधुरूं मधुरु गाती रे**
**मनगमतु भोगवतां भामा करि नेणना चाळारे**
**नरसैयानु पऊश्पणुं रे जाणे म्युं ते वेलां रे -**

(दिवटीवाला रे, दिवटीवाला, हरीने नरसिंहाला दिवटी वाला केला आहे. मनात, पुरुष प्रीती, उत्पन्न झाली आणि जीभ रसमय झाली (पुरुष म्हणजे एकच कृष्ण)

कोणी नाचत आहे. कुणी तान देऊन मधूर मधूर गात आहे. मनपसंत क्रीडेचा आनंद भोगताना, सुदंरी डोळ्यांचे चाळे करीत आहेत. त्या वेळी नरसिंहाचे पुरुषपण नाहीसे झाल्यासारखेच झाले.)

शिवाय त्याच्याही पुढे

**धनि-धनि गोपी, धनि धनि लीला धनि जे रसमां माहाले रे**
**उमिलावरनी बांहे वलम्यो नारसैं दीवी झाले रे-**

(धन्य धन्य गोपी, धन्य धन्य त्यांच्या लीला, यां रसांत आनंद घेणारे धन्य, शंकराला मीठी मारून नरसिंहानी दिवटी धरली)

**वर्णन दृष्ट्या एक सुमधुर स्वतंत्र पद-**

**वृंदावनमा रच्चो अखाडा, नाचे गोपी ने गोपाल**
**नाल, पखवाज-रबाब विसली, तान मिळावे नंदनुलाल -१**
**सुंदर रात्य शरद-पून्यमनी, सुंदर उदियो नभमां चंद**
**सुंदर गोपी-कंचनमाला, विचिमा मरवामणि गोत्यंद -२**
**झलके कुंडल राखडिआरे, लरके परय मोती-माल**
**रमझम रमझम नेपूर वाजे आनि मारकलडां करती बाल्य -३**
**हरख्या सुरिनर, मुनिजन पुष्पि, वधावे त्यांह आणि पखरियो**
**जय जय देव यशोदानंदन, नरबौओ लहां दीवेटीयो -४**

(वृंदावनांत अड्डा जमवला. गोप गोपी नाचत आहेत. ताल, पखवाज, ढोलके, आणि बांसरी

वाजत आहे, नंदकुमार त्यांच्या तालावर गाण्याची तान मिळवीत आहे-१ शरद पोर्णिमेची सूंदर रात्र आहे, आकाशांत सूंदर चंद्र उगवला आहे. सूंदर गोपींची सुवर्णमाळ (दिसते आहे) आणि मधे गोविंद पाचुमणी (प्रमाणे शोभत आहे) कुंडले आणि राख्या झळकत आहेत, छातीवर मोत्यांची माळ रुळत आहे. नुपूर रुमझुम रुमझुम वाजताहेत आणि गोपी बालिका स्मितहास्य करीत आहेत.-३ .देव, मानव , मुनी, एकत्र होऊन तिथे जाऊन पुष्पवर्षाव करीत आहेत. जयदेवा, यशोदानंदना, तुझा जयजयकार असो - तिथे नरसिंह पणती घेऊन उभा आहे.)

शरदऋतुतील क्रीडागीते, याहूनही, मधूर वर्णनात्मक आणि सुलभ आहेत. या गीतावलींचा कीतीतरी भाग भावगीतांत मोडेल असा आहे जो योग्य वेळी पुढे दिला आहे. वर्णनात्मक पद असो अगर भावगीत असो, नरसिंहाची कवीप्रतिभा दोन्ही प्रकारांत फुलून आलेली अनुभवास येते.

**५ श्री कृष्णजन्मसमानां - ६ श्रीकृष्णजन्मवधाईना आणि ७- बाललीलांनो पद**

( ५ श्रीकृष्ण जन्म वेळची - ६ श्रीकृष्णजन्मसमारंभाची आणि ७- बाललीलांची पदे )

वास्तविक ३ प्रकाराची ही पदावली, कृष्णलीला सुरु होण्यापूर्वीची, भागवतांतील दशमस्कंधाच्या प्रारंभीची आहे. यांत कृष्णजन्म- आणि कृष्णजन्मसमारंभाची पदें अशी आहेत, की स्वतंत्र वर्णनात्मक ग्रंथ लिहिण्याची प्रवृत्ती तीं गीते दाखवत आहेत.

**श्रीगुरुने प्रणाम करीने वर्णवुं श्रीजदुराय**
**श्री कृष्णनी लीला सांभळतां पातिक दूर पलाय**

(श्री गुरुला वंदन करून श्री यदुराज (श्रीकृष्णाचें) मी वर्णन करतो. श्री कृष्णांच्या लीला ऐकल्या की पातके दूर पळतात.)

कृष्णाच्या बाललीलांच्या पदांत, त्याचे बालसुलभ खेळ, गोपींच्या घरी जाऊन केलेल्या खोड्या, लोण्याची चोरी, वगैरे प्रसंगाचे वर्णन आले आहे. आकाशांतला चंद्र आणून देण्याचा हट्ट वगैरे, पण या पदावलीत वर्णन केले आहे. बरीचशी वर्णनें नरसिंहाची, स्वतंत्र अशी आहेत. हे एक कमनीय पद -

**आ पेलो चांदलियो आई मुने रमवाने आलो,**
**नक्षत्र लावीने माता , मारा गजवामो घालो -१**
**रूवे ने रातडो थाये, चांदा सामु जुवे**
**माता रे यशोदाजी हरिनां आसूडा लुवे -२**
**लोकनां अनेरां बालक, घेलो तुं कां थाए**
**चांदो आकाशे वहाला, ते केम ले लेवाए -३**

**वाडकामां पाणी घाली चांदीलिये दारण्यों**

**नरसिंयानो स्वामी शामळिओ, रडतो तव राख्यो -४**

( आई, तो तिथला चांदोबा, मला खेळायला दे, आई , नक्षत्र आण आणि माझ्या खिशांत टाक. (१) चंद्राकडे पाहून (कृष्ण) रडत राहिला. रात्र झाली. यशोदा माता कृष्णाचे अश्रु पुसत राहिली. (२) लोक विलक्षण बालकां तूं काय वेडा झाला आहेस का ? चंद्र आकाशांत छान दिसतो. तो कसा बरं घ्यायचा. (३) मोठ्या वाडग्यात पाणी घालून त्यांत चंद्र दाखवला (कृष्णाला) तेव्हा नरसिंहाचा स्वामी श्यामसुंदर रडायचा थांबला.)

**वात्सल्याच्या नमुन्यांपैकीं हे एक गीत -**

**माता रे जशोदा हरिने घूमण घाले,**

**आनंद उलटे उभी वदन निहाले -१**

**घम घम घमके घुघरी हुंकारा करे**

**जोई जोई जनुनीं‌ं मनुडं ठरे -२**

**जहैन काजे महामुनी देह रे दमे**

**ते तो कृष्णाजी पारणांमां रंगे रे रमे -३**

**सुंदर वदन जोई चुंबन दिधु**

**नरसैंयाच्या स्वामी जोतो कारण सीयुं**

(माता यशोदा हरीला (पाळण्याचा) झोका देते. उभी राहून हरीचे तोंड पाहते, तिचा आनंद उफाळून येतो -१ खूप खूप, रुणझुण रुणझुण आवाज येतो, घुंघुर हुंकार देतात (जसे) त्याला पाहून पाहून आईचे मन अगदी तृप्त होते आहे -२ ज्याच्या साठी महान मुनी देह झिजवतात, तो श्रीकृष्ण तर पाळण्यांत खेळतो आहे. आणि मजेत आहे. सुंदर मूख पाहुन पापा दिला नरसिंहाच्या स्वामीचे दर्शन घेतां कार्यसिद्धी झाली "जल कमल छांडी जाने बाला, स्वामी अमारो जागशे " हे "कालिया दमना" चे नरसिंहाचे पद खूप प्रसिद्ध आहे. व्रजभाषेचे अष्टछापीय भक्तकवी सूरदासांचे 'सूरसागर' नावाचे खंडकाव्य आहे. त्यांत नरसिंहाच्या या 'कालियादमन' काव्याचे व्रजभाषिय रूप आढळते. इतके हे काव्य लोकव्यापक बनलेले दिसते. याशिवाय निमाडी लोकभाषेत एका लोकगीताच्या स्वरूपात या पदाचे सरळ किंवा अप्रत्यक्ष रित्या अनुकरण केलेले दिसते. तसेच अनुकरण. 'गुण सागर सुरि' ची छाप असलेल्या एका मारवाडी भाषेतल्या पदांत पण आढळते. एक छोटे सुंदर संवादकाव्य हे इथे पहा - जसे-

**जल कमल छोडी जाने बाळा, स्वामी अमारो जागशे**

**जागशे, तने मारशे, मने बालहत्या लागशे-**

**कहे रे बालक तुं मारग भूल्यो के तारा वेरीए वळावियो**

**निश्चय तारो काळ ज खुट्यो अहियां ते शीद आवीयो ?**
**नथी नागण हुँ मारग भूल्यो नथी, मारा वेरीए वळवियो,**
**मथुरा नगरीमां जुगंटुं रमतां नागतुं शीश हुं हारियो**
**रंगे रूडो, रूपे पुरो, दिसंतो कोडीलो कोकामणी**
**तारी माताए केटला जन्म्या तेमां तु अणखामणी ?**
**मारी मानाए बहु जनम्या**
**जगाड तारा नागने मारुं नाम कृष्ण कहनडो**
**लाख सवानो मारो हार आपुं, आपुं रे तुजने दोरियो**
**एटलु मारा नागथी छानुं आपुं तुजने चोरियो**
**शुं करुं नागण हार तारो, शुं करु तारो दोरीयो**
**शाने काजे नागण तारे, करवी घरमां चोरियो -**
**चरण चांपी, मुछ मरडी नागणे नाग जगाडियो,**
**उठोने बळवंत कोई बारणे बालक आवियो -**
**बेंरूं बळिया बाथे वळगिया कृष्णे कालिनाग नायियो**
**सहस्त्रफेणां फूकवे, जेम गगन गाजे हाथियो-**

( बाळा, हे कमळ सरोवर सोडून जा, आमचा पती जागा होईल, तुला मारील आणि मला बालहत्येचे पातक लागेल. मला सांग बाळा तूं वाट चुकलास, की तुझ्या वैऱ्याने तुला इथे (फसवून) पाठवले ? नक्की तुझें आयुष्य संपले- तूं इथे आलास कुठून ? हे नागिणी, नाही मी वाट चुकलो नाही. मला वैऱ्याने इकडे पाठवले. मथुरेत सोंगट्या खेळतांना 'नागाचे डोके' मी हरवले. सूंदर रंग पूर्ण सौंदर्य असलेला तूं मोठा नटून थटून आला आहेस. तुझ्या आईने किती मुलांना जन्म दिला ? तूं नावडता आहेस कां ? माझ्या आईने दोघांना जन्म दिला, त्यांत मी 'नटवर' छोटा . तूं तुझ्या पतीला उठव . माझे नांव कृष्ण कन्हैया आहे. माझा सवा लाखाचा हार मी तुला देते- तुला मी गोफ (सोन्याचा) देते. माझ्या पतीपासून लपवून इतके मी तुला चोरून देते. नागिणी तुझ्या हाराचे तुझ्या गोफाचे मी काय करूं नागिणी कोणत्या कारणासाठी तुला घरांत चोरी करायची आहे ? पाय आपटून मिशी पिळून नागिणीने नागाला उठवले, अरे उठ बळवान् ! दाराशी कुणी बालक आला आहे. दोघे बळवान् एकमेकांना बाहूंनी आवळून, लढुं लागले, कालिया कालीया नागाला कृष्णाने वेसण घातली (ताब्यात आणले) . आकाशांत हत्तींची गर्जना घुमते त्याप्रमाणे हजारो फणांनी कालिया नाग फुत्कार सोडायला लागला.)

**(८) वसंत नां अने हींडोळाना पद**

**(वसंत ऋतुची आणि झोपाळ्याचीं पदे )**

या पदावलीत कवीचे वसंत आणि वर्षा ऋतुतील कृष्णाचा विहार वर्णन केला आहे. वर्षाऋतुतील विहारपण वसंत ऋतुतील विहाराप्रमाणे वनविहार च आहे. पण यांत खास करून झाडांच्या फांद्याना झोपाळे बांधून झोके घेणे अशा प्रकारचे वर्णन आहे. नरसिंहाना शास्त्रीय रागांची उत्तम माहिती होती. त्यानी दोन्ही ऋतुंतील पदांना अनुकुल असे राग दिले आहेत. उदा. वसंतऋतुतील पदे वसंत रागांत आणि झोपाळ्यावरची पर्दे मल्हार आणि केदार जशा रागांत लिहिली आहेत. या पदांत कितीतरी भाग वर्णनात्मकच आहे. जसा -

**वसंत रत्यनी बहु बलिहारी, नार्‌य निरंकुश फाग रमे**
**माधव सखा सहित ग्रह ग्रह प्रति ज्यम अंबूज-वन भ्रमर-भगे - १**
**मनभावंना वचन परस्पर विनता-व्रंद विलास को ,**
**लडशडतो लाडयलो लघुवर पाई पाई सहुने बाथ भरे -२**
**कनक-कलश केसर रस भरिभरि पाछल मस्तक ढोले**
**करतल बरी शिखंडी अगररस मुखलोचन उपर्‌य रोले -३**
**सासू, नणंदी डाह्यां डमरां मरजादां अनुशरतो**
**ते कहे बहुवर चालो रमियो आडा घूंघट जे धरतां -४**
**नारसिंया च्यो स्वामी नित्य नवली परय विचित्र लीलाकेल्य करे**
**ए लहरिओ झडमां आवे पुरुष लखण तेहेन विशरे -५**

(वसंत ऋतुची मोठी खुषी आहे, स्त्रीया अनिर्बंध होळी खेळतात. कमळांच्या ताटव्यात भ्रमर जसा विहार करतो, तसा एकेकीला घेऊन माधव सखा क्रीडा करतो. -१

एकमेकांशी मनपसंत गप्पा करीत स्त्रीवृंद क्रीडा करीत आहे. मनमौजी लाडका कन्हैया आळीपाळीनी सर्वांना मिठ्या मारतो-२

सुवर्ण कलशांत केशरांचे पाणी भरभरून पाठीकडून डोक्यावर ओततो. ओंजळीत, गोपीचंद आणि चंदनाचा लेप भरून तोंडाला आणि डोळ्यांना फासतो -३ सासू आणि नणंद समंजस आणि नव्या पालवीने भरलेल्या होळीक्रीडेत सामील होऊन घुंघटाच्या आडून विनयपूर्वक म्हणतात. 'वहुवर (कृष्ण) चला खेळुंया -४ नरसिंहाचा स्वामी नित्य नव्या प्रकारची विचीत्र क्रीडा खेळत राहतो. या क्रीडा गुंगीच्या वादळांत (क्षेत्रांत) जो येतो तो आपले पुरुषपण विसरतो.)

अशाच प्रकारे हिंडोळ्याच्या पदात पण वर्णनाचा असा प्रकार पहायला मिळतो

**हिंडोला बांध्यो रे व्रंदावन, हींचोले व्रजनारी रे**
**केसर कामिनी कांनने छाटे उनमदपणे उबारी रे -१**
**वाजा वाजे झोझर नेपूर, घूघरडी घमकार रे**

**अवील गुलाल्ल उछाले अबला उलट अंग्य अपार रे -२**
**श्रावणमास शुहामणो रे, सुंदर जमनातीर रे**
**सुरिनर लोक मळीने आल्यां जोवा हलधर-वीर रे -३**
**गान करे गोपी शुं मळीने काहान कामिनी राती रे -**
**आलींगन चुंबन घे चतुरां अधुर अम्रतरस पाती रे -४**
**हींची हाम हैयानी पोहोती, पोती मननी आश रे**
**हींडोलो राख्यो लक्ष्मीवर, हुं छुं तमारी दासी रे -५**
**मरकलडे मोहनजी मोह्या रह्या भीतर लीधी रे,**
**नरसिंया स्वामी भले मालियो आप सरिखडी कीधी रे -६**

(वृदावनात झोपाळा बांधला आहे, आणि त्यावर वज्रसुंदरी झोके घेत आहेत. केशर, भरभरून घेऊन कामिनी अधिरपणाने कन्हैयावर उडविला आहेत. (१) बाजा , पैंजण नुपूर वाजत आहेत. घुंघुराचा आवाज होतो आहे, स्त्रीया अबीर आणि गुलाल उधळत आहेत. अंगात अपार उल्हास आहे. (२) श्रावणमास सुंदर , यमुना तीर सुंदर, देव मानव सर्व जमून बलराम आणि कृष्णाला पहायला आले (३) कान्हां आणि गोपी मिळून काय सुंदर गाताहेत. रात्र कामिनी झाली आहे. या चतुरा गोपी आलिंगन देताहेत, चुंबन घेऊन ओठावरचा अमृतरस पीत आहेत (४) हिंमत करून घेतलेला झोका (कृष्णाच्या) हृदयापर्यंत पोचला. मनातली आशा पुरी झाली.

श्रीकृष्णानी झोपाळा थांबविला. मी तुमची दासी आहे. (असे कामिनी म्हणाली) तिच्या स्मितहास्याने मोहन मोहून गेले आणि त्यानी तिला उराशी घट्ट आवळले. नरसिंहाचे स्वामी भेटले, फार आनंद वाटला. तिला त्यांनी (कृष्णानी) आपल्यासारखीच केली )

वसंत आणि वर्षाऋतुंच्या या पदावलीत, त्या त्या ऋतूचे आणि त्या त्या वनक्रीडेचे हुबेहुब उभे करण्याची कवीची हातोटी, आपल्याला आकर्षीत केल्याशिवाय राहत नाही. सरळ शब्दांत म्हणजे नरसिंह प्रत्येक वेळची घटना , स्वाभाविक स्वरूपात मूर्त करून दाखवतात.

यांच्या सर्व पदसाहित्यांत परलक्षित वर्णनात्मक गीतांचे प्रमाण फारसे नाही. मनांतल्या भावमय आत्मलक्षीत उर्मीचे यांच्या गीतात खूप प्रमाणात दर्शन होते. हा विषय भावगीतांत मोडतो, म्हणून या नंतर योग्य वेळी तो सांगायचा आहेच.

# ४ ज्ञानी भक्त उपदेशक

व्रज प्रदेशांतील वृंदावनीय भक्तींत दंग झालेल्या कवीकडून सिद्धांतवादी साहित्याची आशा करणे चूकच आहे. नरसिंहाच्या उत्तरकालांतील व्रजभाषिय अष्टछाप कवींनीं तसेच यांच्या पूर्वकालीन, बिहारच्या विद्यापती आणि त्यांच्याही पूर्वीच्या महानुभाव पंथाच्या कवीनीं, या तऱ्हेचे (सिद्धांतवादी) साहित्य लिहिलेले आढळत नाही. वारकरी सांप्रदायाच्या नामदेव कवींनी लीलात्मक काव्य लिहिलें नाही. सैद्धांतिक पदे लिहिली पण त्यांत शब्दलालित्य नाही. कबीरांच्या शेकडों पदांत वाक्चातुर्य, सहजपणे सांपडते. नरसिंह महेतांची उपदेशपर पदें थोडी आहेत आणि त्यांत शब्दलालित्याचा वेग मर्यादित आहे. यांची ज्ञानभक्तिपर पदें पाहिलीं तर केवळ शब्दलालित्याचा वेगच नव्हे तर काव्यतत्त्वाचा रोचक अनुभव मिळतो. नरसिंहाच्या ज्ञत्त्व-भक्ती उपदेश पर साहित्याचे आपण तीन भाग पाडु शकतो.

१ वैष्णव लक्षण २ वैराग्य बोध, भक्ती, आणि ज्ञानोपदेश ज्यांत आहे असा 'उपदेश' आणि ३ शुद्ध तत्त्वदर्शन ज्यांत काव्यचमत्कृती भरपूर आहेत.

**१) वैष्णव लक्षण**

यांत वैष्णव किंवा प्रभुभक्त कसा असला पाहिजे याचा गुणनिर्देश करुन, विचार मांडला आहे. महात्मा गांधीजींनी 'राष्ट्र भक्ती गीत' म्हणून प्रतिष्ठित केलेलें आणि आज संपूर्ण भारतात आदरणीय झालेले हें पद याचा सूचक नमुना आहे.

**वैष्णव जन तो तेणे कहिये**
**जे पीड पराई जाणे रे**
**परदु:खे उपकार करे, ने मन अभिमान न आणे रे -१**
**सकल लोकमां सहु ने वंदे, निंदा न करे केनी रे**
**वाच काछ मन निर्मल राखे धन धन जननी तेनी रे -२**
**समदृष्टी ने तृष्णात्यागी, परस्त्री जेने मात रे,**
**जिव्हा थकी असत्य न बोले, परधन नव झाले हाथ रे -३**

**मोह माया व्यापे नाहितेने, दृढ वैराग्य जेनो मनमां रे**
**राम नाम शुं ताळी रे लागी, सकल तीरथ तेनां तनमां रे - ४**
**वण लोभी ने कपट रहित छे, काम क्रोध निवार्या रे**
**भणे नरसैयो तेनुं दरशण करतां कुल एँकोत्तर तार्या रे -५**

(दुसऱ्यांचे दु:ख जो ओळखतो,त्याला वैष्णव म्हणावे दुसऱ्यांच्या दु:खात जो उपकार करतो, परंतु मनांत त्याचा कधीही अभिमान बाळगत नाही.(१) जो सर्व ठिकाणी सगळ्यांना वंदन करतो,कोणाचीही निंदा करीत नाही - काया वाचे,मने करून जो निर्मल असतो,त्याची माता धन्य धन्य आहे.(२) जो समदृष्टी आहे आणि ज्याने आसक्तीचा त्याग केला आहे,परस्त्री ज्याला मातेसमान आहे. असत्य वाणी जो उच्चारित नाही,परद्रव्याला जो शिवत नाही (३) मोह माया ज्याला नाही,आणि ज्याच्या मनांत दृढ वैराग्य आहे,राम नामात जो तल्लीन आहे,त्याच्या मनात सर्व तीर्थे आहेत.(४) जो लोभ विरहित आणि कपटरहीत आहे,ज्याने काम क्रोधाचें निवारण केले आहे,नरसिंह म्हणतात,याचे दर्शन ज्याने घेतले. त्याची ७१ कुळे तरली.

'वैष्णव जनने विषयथी ठळवुं' आणि 'वैष्णव जनने विरोध न कोई शुं' जशीं लक्षणात्मक पदें आणि वैष्णव ते जे स्नेहमारगी हरि शुं खरो अभिलाख' अशी पण लक्षणात्मक गीते आतां ज्ञात आहेत. खालील पद काव्यतत्त्वाने भरलेले आढळते -

**संतो, अमे रे वेवारिया श्रीरामनामना**
**वेपारी आने छे बधा गामगामना**
**हमारुं वसाणुं साधु सरु कोने भावे**
**अढारे वरण जेने हारवाने आवे-**
**हमारूं वसाणुं काळ दुकाळे न खुटे**
**जेने राजा न दंडे, जेने चार न लूटे**
**लाख विनाना लेखा नही, ने पार विनानी पूंजी**
**होखी होय तो होरी लीजो कस्तुरी रे सौंधी**
**राम नाम धन हमारे, वाजे ने गाणें**
**छप्पन उपर भेर भेरी भुंगक वाजे -**
**आवरो ने खातावहीमां लक्ष्मीवरनुं नाम**
**चीतमां चतुरभुज लाखिया, नरसियानुं काम -**

(संत जनहो,आम्ही रामनामाचे व्यापारी ,गावगावचे सगळे व्यापारी येत राहातात. आमचा माल (वसांणु औषधी पाक) साधुना आणि सर्वानाच आवडतो. अठरा वर्णाचे लोक ज्याला संपवायला येतात,तो आमचा औषधी पाक (माल) कोणत्याही काळी,दुष्काळांतही संपत नाही.

त्याला राजा दंडीत नाही, चोर लुटीत नाही. याची नोंद लाखांचीच असते. याच्या भांडवलाला पार नाहीं घ्यायचे असेल तर भरभरून घ्या कस्तुरी स्वस्त आहे. आमचे धन रामनाम आहे. त्याचा मोठा गाजावाजा आहे.(याच्या गुणवर्णनात ) भेर भेरी पिपाण्या वाजतात, त्यांची संख्या ५६ च्या वर असते. आवका आणि हिशोबाच्या वहीत, लक्ष्मीवराचे नाव आहे. मनांत चतुर्भुजाचे नाव लिहीणे, नरसिंहाचे काम आहे.) - यांत एकही लक्षण उघडपणे निर्देश केलेले नाही - परंतु प्रभुनामाचे अहर्निश जप काव्यात्मक भाषेंत मनोरंजक केला आहे. एकापदांत नकारात्मक रितीने लक्षण सांगितले आहे.

**वास नाही ज्या वैष्णव केरो, त्यां नव वासिये वासडियो -श्वासोश्वास हरिस्मरण न करे जो, श्वास धमण केरी श्वासडिया -जिभलडी जपमाला न जपे, तो जीभलडी नही खासडियां -जनम तेनो नहि लेखामां, जे न केहेवाय हरिदेसडिया-मोहनजीनी माया पारवे अवर माया जम -फासडियां भणे नरसैंयो भारे मारी मावलडी दश मासडिया -**

( जिथे वैष्णवाचें वास्तव्य नाही, तिथे मुरलीवाला राहात नाही, जो श्वासाश्वासा बरोबर हरिस्मरण करीत नाही, त्याचा श्र्वासोश्र्वास म्हणजे भात्याचा श्र्वासोश्र्वास आहे. जिभेने वाणीने जो नामस्मरण करीत नाही, ती जीभ नाही. जो स्वतःला हरीचा दास म्हणवत नाही, त्याचा जन्म लक्षात घेण्याजोगा नाही. मोहन च्या प्रेमापुढे इतर प्रेम, नसून फास आहे. नरसिंह म्हणतात माझ्या आईने माझा भार १० महिने (व्यर्थ) वाहिला )

आपल्याला वाटते कवी कांही उपदेश करूं पहात आहे, पण खोलवर विचार केला की, समजते यांत हरिस्मरण जप शरणभावना, प्रभुवर आत्यंतिक प्रेम हींच लक्षणे सांगितली आहेत. साधी गोष्ट काव्यामय करून, काव्यप्रतिभेने तेजाळ करायची हे नरसिंह महेतांचे वैशिष्ट आहे.

२) **उपदेश** - नरसिंह महेतांच्या उपदेशपर काव्यांची संख्या फारशी मोठी नाही. त्यात साधा उपदेश, ज्ञान भक्ती वैराग्याचे महत्त्व सांगणारा उपदेश तसेंच विशिष्ट कृष्णभक्तीच्या अनुसंधानात उपदेश आणि काही शिकवण्याच्या उद्देशानीं रचलेली पदे, यांचा समावेश होतो. **"रेहेत रजनी ज्यारे पाछली खटपडी, "** **"जो गमे जगतगुअरवे जगदीशने"** वगैरे पदें साध्या उपदेशाची आहेत. नरसिंह अशा तऱ्हेच्या पदांतही 'काव्यप्रकाराचा' अवलंब करतात. जसे -

**देती वेळांमा हाथ वावरी लेजो, आगल लाफा लोळ नथी**
**आज छे एक काव्य नथी, काळे छेतरिया मोटा छत्रपती**
**मनसा देही देवताने दूर्लभ, एवुं रे जाणीने लगे भजो रे हरी**
**पशु पंखीमां अवतरशो, पछे दानपुण्य नहि थाय फरी**
**लख चौरासिमां फरी पडशो, जमदूत आवे तेने शुं केहेरमे ?**

**हाडय् छेड् करिने सौको हांकशे एवा अवतार तमे केम रे सहरमे**
**कर्म तणो कांकरो काढी नारण्या, माथे मरण तणी छे मोठी घाटी**
**भणे नरसैयो भजन करी ल्यो, पलवट वाळीने थावो माटी**

( द्यायच्या वेळी (दान) हातांचा वापर करा (मुक्त हस्ते दान करा ) पुढे कांही भानगड नको. आज आहे तसे उद्या नाही - मोठ्या राजेरजवाड्यांना काळाने फसवले आहे. मनाने, देहाने आणि देवताना दूर्लभ ,हे ओळखून,तुम्ही हरीला भजत जा - पशू पक्ष्यांच्या जन्माला याल तर परत दानाचे पुण्य मिळणार नाही. चौऱ्यांशी लाख योनीत पुन्हा पडाल, यमदूत येतील, त्यांना काय सांगाल ? सगळेजण तुला ,तिरस्कार करून, त्रास देऊन हाकलतील असा जन्म तुला कसा से सहन होईल ? कर्मातल्या अडचणी दूर केल्या तरी मृत्युत कटोकटी-विघ्न आहे. नरसिंह म्हणतात, भजन करून घे (भक्ती कर) आणि कमर बांधून खंबीरपणे तयार रहा .)

फक्त ज्ञानोपदेश देणारी "ज्यां लगी आतमा तत्त्व चिन्यो नही," "एक तुं एक तु एम सौ को स्तवे" अशी पदे थोड्या प्रमाणांत आहेत. भक्तीमूलक पदांची संख्या पुष्कळ आहे. खालील पदांचे लक्ष्य 'भक्तीयुक्त ज्ञान' आहे, हे पहायला मिळते.

**'जाय छे जुनानी, तारी जाय छे जुनानी**
**हरिना भजन विना जाय छे जुवानी -**
**काया तारी कंचन जेवी, मोती जेवा पाणी**
**मुआ केडे बाळी मुकशे उडी जशे काहनी**
**जती रेहेशे जुवानी ने पछी थाशे हाणि**
**छावा माना जमडा आवशे लेइ जशे ताणी-**
**माटे तमो माया तजी थाओने ज्ञानी**
**नरसैयांनो स्वामी साचो, दुनिया दीवानी**

(तारुण्य जात आहे, तुझे तारुण्य संपत आहे. हरीच्या भजनाशिवाय, तुझे तारुण्य जात आहे. तुझी काया सोन्यासारखी आहे. कीर्ती मोत्यासारखी आहे. तूं मेल्यावर तुला जाळून टाकतील आणि तुझी जीवनकथा उडून जाईल. तुझे तारुण्य संपेल आणि नंतर नुकसान होईल. चुपचाप यमदूत येतील आणि जबरदस्ती तुला घेऊन जातील. म्हणून तुम्ही मायेचा त्याग करून ज्ञानी व्हा नरसिंहाचे स्वामी काय ते 'सत्य' आहेत, बाकी हे जग वेडे मूर्ख आहे.)

भक्ती करण्याचा साधा उपदेश देणारी, पदें खूप आहेत. **'साधु साचे भजो चरण गोंविंदना'** **' हरि हरि रटण कर कठण कलिकालमां' ' ध्यान धर ध्यान धर नेत्रमां नाथ छे' 'ध्यान धर हरि तणुं' 'समर ते श्रीहरी' 'अल्या भुल्य मा भुल्य मा भक्ती भूधर तणी' 'जुवानी ने दहाडे रे हरिने जाण्या नही रे' ' घडपण कोने मोकल्यु '** ?

वगैरे अनेक पदें आहेत. शेवटच्या पदांतले मृत्यू जवळ आल्यावर येणाऱ्या विचारांचे चित्र खूप मार्मिक वाटते.

**घडपण केणे मोकल्युं जाण्युं जोबन रहे सौ काळ**
**उमरा तो डुंगरा थया रे, पादर थयां परदेश**
**गोळीई तो गंगा थई रे अंगे उजळा थया रे केश, -**
**न होतुं जोईतु ने शीद आवियुं रे, नहोती जोई तारी वाट**
**घरमांथी हलवा थया रे, एनी खुणे ढळावोने खाट -**
**नानपणे भावे लाडवां रे घडपणे भावे शेव.**
**रोज ने रोज जोईए राबडी रे एवी बळी रे घडपणनी टेव -**
**प्रात:काळे प्राण माहरा रे, अन्न बिना अकलाय**
**घरनां कहे 'मरतो नथी रे', तने बेशी रहतां शुं थाय ?**
**दीकरा तो जुजवा थया रे, वहुओ दे छे गाळ**
**दिकरीओने तो जमाई लोई गया, हवे घडपणना शारे हाल ?**
**नव नाडी जुजवी पडी ने आवी पहोच्चो काळ'**
**बैरां छोकरां फट्फट् करे रे नाना बालक दे छे गाळ**
**अंतकाळे वळी आविया रे दिकरा पधर्यां द्वार**
**पांसणीराथी वांसणी रे पछी छोडिने आपी बार**
**एवुं सांभळी प्रभु भजो रे संभारजो जगनाथ**
**पर उपकार कीधे पामशोरे गुण गाय नरसैयो दास**

( सतत तारुण्य राहील असे वाटत असतानां, म्हातारपण कोणी पाठवले. उंबरठा डोंगरासारखा वाटतो आहे. आणि सरहद्द परदेशासारखी झाली आहे. पाण्याचा घडा, गंगा वाटायला लागली आहे. आणि सर्व अंगावरचे केस पांढरे झाले आहेत.

नको होते ते कशासाठी आले आहे ? तुझी वाट मी पाहिली नव्हती- घरांत प्रतिष्ठा राहिली नाही. "कोपऱ्यात हलवा याची खाट" (असे म्हणतात) लहानपणी लाडू आवडत होते, म्हातारपणी शेव हवीशी वाटते आहे. रोज रोज बासुंदी हवी आहे, अशी म्हातारपणची जळ्ळी सवय– अन्नाशिवाय सकाळी माझा जीव व्याकुळ होतो, आणि घरांतले म्हणतात 'मरत नाही. अरे तुला गप्प बसायला काय होते आहे." (गप्प बस) "मुलगे वेगळे झाले. सुना शिव्या देतात. जावयी मुलींना घेऊन गेले - आता म्हातारपणाची काय स्थिती होणार ? शरीरातल्या ९ नाड्या सुटत चालल्या आणि काळ येऊन पोचला- बायका मुले तिरस्कार करू लागली. छोटी मुलेही शिव्या देऊ लागली (अवमान करू लागली) - अंतकाळी मुलगे दाराशी येऊन ठाकले.

अस्थिपंजर तिरडीवर आणि नंतर बाहेर सोडून येणार हे सारं ऐकून (तरी) प्रभुला भजत जा. त्या जगन्नाथाची आठवण करा -पर उपकार करून (मुक्ती) मिळेल नरसिंह दास (ईश्र्वराचे) प्रभुचे गुणगान करतात)

**३ शुद्ध तत्त्वदर्शन**

नरसिहानी 'शुद्ध तत्त्वदर्शन' संबंधित पदें अगदी थोडी लिहीली आहेत. सर्व जडचेतन जगाचा विकास परब्रह्म श्रीहरी पासून झाला. हा सिद्धांत ते सरळ भाषेत वर्णन करतात - जसे

**अखिल ब्रम्हांडमां एक तुं श्रीहरि जुजवें रुपे अनंत भासे**
**देहमां देव तुं, तेज तत्त्व मां तत्त्व तुं शुन्यमां शब्द थई वेद वासे**
**पवन तुं पाणी तुं भूमी तुं भूधरा, वृक्ष थई फुली रह्यो आकाशे**
**विविध रचना करी अनेक रस लेवाने, शिव थकी जीव थयो एज आशे**
**वेद तो एम वदे स्मृती श्रुती शाख दे, कनक कुंडल विषे भेद नोहे**
**घाट घडिया पछी नामरूप जुजवां अन्त्ये तो हेमनुं हेम होये**

**वृक्षमा बीज तुं, बीजमां वृक्ष तुं**
**जोवुं पटतरो एज पासे**
**भणे नरसैयो, ए मन तणी शोधना**
**प्रीत करूं प्रेमथी, प्रगट थाशे.**

(सर्व ब्रम्हांडात तूं एकच आहेस,श्रीहरी (हे ब्रम्हांड म्हणजे श्रीहरीच आहे ) अनेक रूपांमुळे तुं अनंत भासतोस.शरीरांतला देव (आत्मा) तूं,तेजांतलें प्रकाशतत्त्व तूं, आकाशात शब्द होऊन तूं वेद सांगितलेस. हे भूधरा, वारा तूं, पाणी तूं आणि भूमी तूं वृक्ष होऊन आकाशांत फुलतो आहेस. अनेक रसांचा स्वाद घ्यावा म्हणून तूं नानाप्रकारच्या रचना केल्यास आणि याच आशेने तूं शीवा चा जीव झालास. वेद म्हणतात आणि स्मृतिश्रुति साक्ष देतात की,कनक आणि कुंडल यात (वस्तुतः) भेद नाही. सोन्याचे घाट बनवले,मगच त्यांची रूपे आणी नावें भिन्न झाली शेवटी सुवर्ण ते सुवर्णच राहणार. वृक्षातलें बीज तूं, बीजातला वृक्ष तूं हा विभक्तपणा एकाजवळच आहे,हें मी पाहातो.(वृक्ष आणि बीज हा विभक्तपणा एकांतच आहे ) . नरसिंह म्हणतात मनात विचार करून पहा. प्रेमपूर्णतेंने प्रेम करूनच तो परमेश्र्वर प्रगट होतो ).

श्री वल्लभाचार्यांनी प्रसृत केलेला 'अविकृतपरिणामवाद' विचारांत घेऊन, अखंड ब्रम्हवादाच्या सिद्धांतानुसार तत्त्वसिद्धांत इथे पहायला मिळतो, काश्मीरच्या शैव तंत्रात आणि वारकरी संप्रदायाच्या ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीत अशा प्रकारच्या सिद्धांताचे दर्शन होते. श्री वल्लभाचार्यांकडे वेदांतसिद्धांताची जी परंपरा आली, ती कर्नाटक आंध्र वगैरे प्रदेशांत, प्रसार

पावलेली होती असे आतां निदर्शनास आले आहे.श्री वल्लभाचार्यांच्या पूर्वी,५०० वर्षाहूनही अधिकच्या काळांत, नृसिंहउपासक विष्णुस्वामींनीं ही वेदांत सिद्धांत प्रसारित केला होता. नरसिंहाना ही परंपरा वारकरी संप्रदायाकडून ,बहुधा मिळाली असावी असा संभव वाटतो. शुद्ध परब्रम्हांतून जडचेतनात्मक सृष्टी विकसली,आणि त्यांत एकच ब्रम्ह आहे,त्याव्यतिरिक्त दुसरे कांहीही नाही, हीच गोष्ट नरसिंहाच्या वरील पदांत स्पष्ट आहे. अशा तऱ्हेचा ब्रम्हसाक्षात्कार केवळ प्रेमाने प्रेमलक्षणा भक्तीनेच शक्य आहे, हा भागवत पुराणात व्यक्त झालेला,वैष्णवी सिद्धांत,नरसिंहानी वर्णन केला आहे.

नरसिहांच्या खूप प्रसिद्ध गीतांत '**जागीने जोऊ तो जगत दीसे नही, रुंधमां अटपटां भोग भासे**' च्या दुसऱ्या चरणांत,अज्ञानी अवस्थेत येणारे अनुभव स्पष्ट केले आहेत.कनक आणि कुंडला चा दृष्टांत देऊन, कार्य कारणाचा अद्वैतभाव, नरसिहांनी सादर केला आहे. कवी असल्यामुळे तत्त्वदर्शनांतही,काव्यमयता कायम ठेवतात -

**निरख ने गगनमां कोण घुमी रह्यो, ते जहु, ते जहु शब्द बोले**
**श्यामना चरणमां इच्छुं छुं मरण रे, अहियां कोई नथी कृष्ण तोले**
**श्याम शोभा घणी बुद्धि ना शके कळी, अनंत उच्छवमां पंथ भूली**
**जड ने चेतन रस करी जाणवो, पकडी प्रेमे संजीवन मूळी**
**जलहर ज्योत उद्योत रविकोटमां , हेमनी कोर ज्या निसारे तोले**
**सच्चितानंद आनंद क्रीडा करे, सोनामां पारणांमाही झुले,**
**बत्ती विण तेल विण सूत्र विण जो वळी, अचल झळ्के सदा अनलदीनो**
**नेत्र विण निरखवो, रूप विण परखवो, वण-जिव्हाए रस सरस पीवो**
**अकल अविनाशी ए नवज जाये कल्यो अगध उरधनी मांहे महाले**
**नरसैयाच्यो स्वामी सकल व्यापी रह्यो प्रेमनां तंतमां संत झाले.**

(पहा ना 'हृदय' आकाशांत कोण फिरत आहे. 'तोच मी' 'तोच मी' असा शब्द बोलत आहे. श्रीकृष्णाच्या चरणाशी मृत्यू व्हावा हीच माझी इच्छा आहे.इथे या जगांत,कृष्णाच्या तुलनेत कोणी नाही.अनंत उत्सव समारंभात वाट चुकलेली बुध्दी,शामसुंदराची अत्यंत शोभा महती जाणू शकणार नाही. जड आणि चैतन्य यांचा एकरस करून,प्रेमाने संजीवन देणारी मुळी (श्रीकृष्ण) ओळखावी आणि पकडावी.कोटी सूर्यांचे तेज (त्या परब्रम्हांत) झळकत आहे.जिथे (ते परब्रम्ह कृष्णरूपाने अवतरते तिथे) सोन्याची झळाळी त्याच्याशी बरोबरी करायला बाहेर पडते.

सच्चितानंद आनंद खेळ करतो आहे.सोन्याच्या पाळण्यांत झोके घेतो आहे.ज्योतिशिवाय,

तेलाशिवाय, वातीशिवाय पहा तर सदासर्वकाळ अग्नीचा दिवा स्थिरपणे झळकत आहे- नेत्राशिवाय पहावा, रूपाविना ओळखावा- जिभेशिवाय सूंदर रसास्वाद करावा हा कालातीत, अविनाशी कल्पनातीत आहे. (उर्ध्व अधर) वर खाली, मध्ये, (सर्वत्र) हा आनंद करतो आहे. नरसिंहाचा स्वामी सर्वव्यापी आहे. प्रेमाच्या धाग्यांनी संत, त्याला पकडतात.)

छांदोग्य उपनिषदांचे महावाक्य 'तत्त्वमसि' त्याचा सुप्रसिद्ध सिद्धांत या पदांत स्पष्ट केला आहे. महावाक्याचे सर्व शब्द घेऊन, त्यांत व्यक्त झालेल्या अखंड ब्रम्हवादाचा परिचय देऊन, जीवाभावाची आणि जगतभावाची सत्यता वर्णन केली आहे. त्याबरोबरच अशा स्वरूपाची ब्रम्हप्राप्ती केवळ प्रेमाने होते, हा भक्तीमार्गाचा परम सिद्धांत हे (नरसिंह) बोटाने दाखवित आहेत. प्रेमाच्या सानिध्यांत तर नरसिंह. ज्ञानाच्या गोष्टी पण तुच्छ समजतात, म्हणून त्यांना ज्ञानाची नव्हे तर प्रेमाची अपेक्षा आहे.

**प्रेमरस पाने तु, मोरना पिछधर, तत्वनुं टुंपणुं तुच्छ लागे**
**दूबला ढोरनु कुशके मन चले, चतुरधा सुक्ती तेओ न मागे-**

(मोराचे पीस धरणाऱ्या रे तू प्रेमरस पाज. मला तत्त्वज्ञान चर्चा तुच्छ वाटते. दुबळया जनावरांचे मन गवतांत (खाण्यांत) राहणार, चतुरधा मुक्ती ती मागत नाहीत.)

याच पदांत नरसिह स्पष्ट करतात :-

**मे ग्रह्यो हाथ गोपीनाथ गरवा तणो, आवर बीजुं कोई ये न भावे**
**नरसैया महामती, गाय छे गुणकथी, जति सतिवे तो स्वप्ने न आवे**

(थोर गोपीनाथाचा हात मी धरला आहे. आता मला दुसरे काहीही आवडत नाही. महाबुध्दीचा नरसिंह प्रभुच्या गुणांच्या कथा वर्णन करतो. साधू, साध्वीच्या स्वप्नातही त्या कथा येणार नाहीत.)

आणि अशा रितीने ज्ञानमार्गाला कमी प्रतिचा लेखून प्रेमलक्षणा भक्तीचे प्राधान्य वर्णन करतात.

ते दुसऱ्या ठिकाणी म्हणतात पण

**भूतल अवतारंनु फल एह, जो माहात वहाला शुं धरिये नेह**
**भक्ती सरखी जेहने घरदासी, तो शुंकीजे अवर उपासी**
**जप तप तीरथ देहडी न दमिये, जो महारा वहाला शुं रंगभेररमिये-**
**जनमजनमनी हरिदासी थाशुं, नरसैंयाच्या स्वामीनी लीला गाशुं-**

(पृथ्वीतलावर जन्म घेण्याचे फळ मिळते ते हे की, माझ्या प्रिय कृष्णावर प्रेम करतां येते. भक्ती सारखी ज्याच्या घरांत दासी आहे, तिथे इतर आराधना करायचे काय ?

जप तप तीर्थ याना करून देह दमवूं नये तर माझ्या कृष्णाशी आनंदभराने क्रीडा करावी जन्मोजन्म हरीची दासी होऊन राहुं, आणि नरसिंहाच्या स्वामीच्या लीला गाऊं)

आणि आपण पाहिले आहे की, यांच्या आत्मचरित्र पर काव्यांत फक्त अनन्य शरणागतीची भावनाच यांनी वर्णन केली आहे. ज्ञानापेक्षा भक्तीची श्रेष्ठता यांना अभिप्रेत आहे, हे नरसिंहानी स्पष्ट केले आहे.

# ५ भावगीत गायक (भावगीतोने गानारो )

गुजराथी साहित्याचा इतिहास लिहिला जाऊं लागला, तेव्हापासून नरसिंहांना आदिकवी म्हणून मान्यता देण्यात आली आहे. मध्ये एकदा एक असा विरोधी स्वर उमटला की, नरसिंहाच्या पूर्वी पण प्राचीन गुजराथी साहित्य निर्माण झाले होते, म्हणून त्याना आदिकवी म्हणता येणार नाही. जैन साहित्यिकांनी रास-फागु-बारमासी इत्यादी रचना केल्या. एक गोष्ट स्पष्ट आहे की, त्या सर्व रचनांत उत्तरकालीन गुर्जर भाषेचे अपभ्रष्ट रूप, कोणत्या ना कोणत्या प्रकारे, प्रयत्नपूर्वक समाविष्ट करण्यांत आले होते. व्यावहारिक भाषेचा कल, नवीनतेकडे संपूर्णपणे झुकला होता तरीपण लेखनांत जुन्या भाषेचा वापर करायचा प्रघात होता. हे खरं की नरसिंहाच्या काळांतली, त्यांच्या रचनांची हस्तलिखिते उपलब्ध नाहीत. वि.स. १६५०-५५ इ.स. १५९४-९९ ची एक प्रत (मुंबई गुजराती प्रिं प्रेस ची ) आणि दुसरी, सं. १६६८ इ.स. १६१२ (अहमदाबाद-गुजराथ विद्यासभाची नं.६९ ची, प्रत, अशा या दोन प्रती, अजून पर्यंत सापडलेल्या जुन्यांत जुन्या प्रती होत. ज्या काळात गुजर (भाषा किंवा मध्यकालीन गुजराथी भाषेशिवाय एक तिसरी भाषा लेखन प्रचारांत होती, ह्या काळात अर्वाचीन बोली भाषा जतन करणाऱ्या या प्रती पाहून असा संभव वाटतो की, ) नरसिंहानी आपल्या काळांतल्या बोलीभाषेचा आपल्या लेखनांत आदरपूर्वक वापर केला असला पाहिजे.

ही गोष्ट समजा आपण विचारात घेतली नाही तरीही काव्यरचनेत भावगीतांचा जो प्रकार नरसिंहानी हाताळला तो गुजराती साहित्यात सर्वप्रथम होता. या भावगीतांची संख्या थोडी थोडकी नाही. शेंकडोनी आहे. गुजराती हस्तलिखितांच्या संग्रहात आणि खाजगी मालकीच्या हस्तलिखित भांडारात, अजूनहि अज्ञात असलेली भावगीते सापडत आहेत. हे लक्षांत घेतले की वाटते विवाह काव्यात लक्ष सवा तणुं नाम कीर्तन करुं (तुझे सव्वालक्ष नामकिर्तन करतो) ही प्रतिज्ञा थोडी जरी अर्थपूर्ण मानली तरी हजारो पदे, नरसिंहानी रचली असली पाहिजेत. निरनिराळ्या चालीत बसणारी असंख्य पदें आणि झुलणाना ढाळ (झोपाळ्यावरची गीतांच्या चालीवर) ची अनेक पदें त्यांच्या हातून रचली गेली.

हा प्रकार हाताळणारे नरसिंह प्रथम कवी होते, म्हणूनच त्याना सुरवातीला मिळालेला आदिकवी चा मान ढळूं शकत नाही. गुजराती साहित्याला पद्य साहित्याने समृध्द करणारे नामी अनामी शेकडो साहित्यिक झाले आणि शेकडो अज्ञातही आहेत. त्या सर्वामध्ये आपल्या विशिष्ट प्रतिभेने चमकणारे ३ कवी प्रथम श्रेणीत बसतात. १५ व्या शतकातले नरसिंह, सर्वोत्तम आख्यानकार म्हणून. १७ व्या शतकाच्या उत्तरार्धातले, प्रेमानंद आणि श्रेष्ठ दर्जाची पदें आणि गरबागीतांमुळे प्रसिद्ध असलेले १९ साव्या शतकाच्या पूर्वार्धातील दयाराम, हे ते कवी होत . .दुसरे सारे कवी या कवीच्या तुलनेत कमी दर्जाचे वाटतात.

नरसिंह महेतांनी आपली आदिकवी ही पदवी सिद्ध केली ती त्यांच्या भावगीतांमुळे ही भावगीते कृष्णाचा विहार या विषयाशी संलग्न आहेत. जयदेवाच्या गीतगोविंद काव्यातूनच नरसिंहाना, आपल्या भावगीतांच्या विचाराला खाद्य मिळाले. नरसिंहाच्या चातुरी गीतांत वर्णनात्मक भाग मुख्यतः आहे, याची आपल्याला थोडीशी कल्पना आली आहे. गीतगोविंद काव्यांतही वर्णनात्मक भागच मुख्य आहे. नरसिंहाच्या विशाल साहित्यातून पूर्वी सांगितलेली वर्णनात्मक पदें वजा केली तर, वेगळ्याच थाटाची आत्मलक्षित अशी भरपूर भावगीते नजरेत भरतात. त्याचा विचार केला, तर आपण स्वतः त्या त्या ठिकाणी एक पात्र म्हणून आहोत, अशा वर्णानांची, गोपींच्या तोंडून घातलेल्या पदांचे आपण विच्छेदन करू शकतो. १) रास शरदना पद (शरदऋतुतील रास क्रीडा पदे) २) वसंतना (वसंत ऋतुतील) ३) हिंडोळाना (झोपाळ्यावरची) ४) दाणना (दान वसुली ची) ५) शृंगारमाळा (शृंगाराची ) ६) चांदलाना (चंद्राची )

वरील ६ ही प्रकारांत मुख्यतः वियोग शृंगार रचना भरपूर प्रमाणांत आढळतात, अर्थात कांही काव्यरचनांत संयोग शृंगाराचेही दर्शन होते. आपण क्रमशः त्यांचा परिचय करून घेऊ.

**१ रास शरदनां पद ( शरद ऋतुतील रासक्रीडा पदावली )**

शरदऋतूतील - खास करून आश्विन महिन्यांतल्या श्रीकृष्णाच्या वनक्रीडेची यांत वर्णने आहेत. कथाभागाऐवजीं पात्राच्या तोंडी घातलेल्या गीतांमुळे, या रचना आपोआपच भावगीतांच्या सदरांत येतात. रासक्रीडेसाठी व्याकुळ झालेल्या गोपींचे शब्द

**सजनी रे, श्यामलीओ वेण वाहे**
**रही न सकुं मारा तन मांहे**
**जागो मिलवाने मन थाए -**
**जल -जमुना -मसि आपण्य बहीनी, चालो जोवा जईए-**
**सास मारी घेरय नथी, कानजीने कहिईं**
**जे किहिरो ते सिहिस्युं आपण्यात चालो जोवा जईई**

**नरसैयांच्या स्वामीने संगि रासलडा रे लही ईं**

(सखी गं श्याम मुरली वाजवतो आहे. माझ्या शरीरांत मी राहू शकत नाही. ऐक, त्याला भेटायची माझ्या मनांत इच्छा होते आहे. चल ग बहिणी, पाण्याने भरलेल्या यमुना नदीवर, कृष्णाला पहायला जाऊं -कन्हैयाला सांगू, माझी सासू घरीं नाही म्हणून जे बोलेल, ते सहन करूं पण आपण कृष्णाला पहायला जाऊं. नरसिंहाच्या स्वामी बरोबर आपण रासक्रीडा खेळुं.)

नायकाचा विरह यात स्पष्ट होत आहे.

**बाटडी जोऊं नाथ, नाहली**
**संगम रमवा माटेय जात मींबालीरे**
**पिहिलुं अम्ह-स्युं प्रीत करीने शुं मेहलु विसारी रे**
**मननी वात तु कुहुने कहिई ? अम्हने वेदनं भारी रे**
**आगे अम्हने बपैडा मारे, अम्हे अबला किम रहिये रे**
**नरसिंयाच्या स्वामी विन बाई धीरज क्यटलुं धरीई रे ?**

(नाथ, मी प्रिया तुमची वाट पहात आहे. तुमच्याबरोबर क्रीडा करावी या इच्छेने मी 'माझेपण' संपवून आले आहे. प्रथम आमच्यावर प्रिती केली, आतां सारे विसरून आमचा त्याग करता का ? मनांतली गोष्ट आम्ही कोणाला सांगावी ते सांगा. आम्हाला केवढ्या यातना होताहेत. अगोदरच आम्हाला बाप मारतो आहे. आम्ही अबला कसे दिवस काढायचे. नरसिंहाच्या स्वामी शिवाय बाई ग किती धीर धरायचा.)

आणि नायकाचे मीलन झाल्यावर परत फिरायला नायक सांगतो तेव्हां नायिकेचा मनःक्षोभ होतो

**'श्या माटे शामलिया वा' ला शान करी वन्य तेडी रे ?**
**व्याकुल विनता थई शहु अंगे, वेण वजाडी रूडी रे.**
**आणि वेळा अधराते वला परवरिया परवार रे**
**शामुं आल चडावो अमने, लीलज नंदकुमार रे,**
**बोल विचारी बोलण्यो रे अमे अबला बल थोडुं रे**
**नरसिंयाच्या स्वामी, रस पुरो दीन थई कर जोडुं रे-**

(लाडक्या शामसुंदरा, शृंगार करून आम्हाला, कशासाठी वनांत आणलेस. सर्व बाजूंनी गोपी व्याकुळ झाली. तू मुरली अशी सुंदर वाजवलीस सर्व संसार सोडायला लाऊन तूं आम्हाला अर्ध्या रात्री आणलेंस. आता लीलाधर नंदकुमारा, शामा आमचे रक्षण कर. नीट विचार करून सांग आम्ही कमी शक्ती असणाऱ्या अबला आहोंत. नरसिंहाच्या स्वामी क्रीडा रस पुरा कर. काकुळतीने आम्ही हात जोडतो.)

आणि नायकाच्या केवळ दर्शनानेच मीलनाचा अनुभव -

**वाहलो आलिंगन सरखो, नयण भरी भरी निरखो जोई जोई मन हरखो-**
**सकल विश्व शीखंतां, बाई, मुख उपरय् मुथ मुकवूं लाल**
**ए विषय आता न जाणु कहो सखी अमृत कुणी पिरूला**
**ज्या एहवुं त्या स्नेहसमक्ष शी अम्हने तां अलगां मेहलो**
**नरसियाच्या स्वामी जशी, यौवना अण तेड्यो आवे वेहलो**

(रा. रा. समुद्धार पृ.३७६ )

(प्रियाने आलिंगन देताना नेत्र भरभरून मला पाहिले आणि मनं हर्षभरीत झाले सर्व विश्वाला शिकवणारा त्याने माझ्या ओठांवर ओठ ठेवले ग बाई, या विषयांत मला काहींच समजत नाही. सखी अमृत कोणी कोणाला पाजले ?

जिथे हे असे तिथे प्रेम, किंवा ममजण्याची बुद्धी कुठली आम्हाला तर त्याने वेगळंच ठेवलं नरसिंहाच्या स्वामी यौवनपूर्ण सुंदरी पहातांच मन बोलवतांच त्वरीत येतो.)

आणि नायकाच्या मीलनात परमतृप्तीचा अनुभव

**आज मारां नयणा सफल थयां, जोया नाथनी निरवी**
**सुंदर वर निहाळीने मारा हिईडामा हरखीं आज**
**जेऊं मारा मनमां हतु तेवुं वाहले कीधुं**
**प्रेमे प्रभुजी पधारिया आवी आलिंगन दीधूं**
**वाहाले मारो विहारिओ, हरिने जवा न दीजे**
**हाथ थकी नव्य मूभीई अंतरगत्य लीजे -**

(नाथाला निरखून पाहून आज माझे नेत्र सफल झाले. प्रियाचे सौदर्य पाहून माझ्या मनांत मी आनंदले. माझ्या मनात जे होते तेचं प्रियाने केले. प्रेमाने प्रभु आले आणि मला आलिंगन दिले. माझा प्रिय कृष्ण मोठा रसीक आहे. हरीला जाऊ देऊ नका, त्याला हातांतून सोडायला नाही मनांत साठवायचा.)

यापुढील ओळी मात्र वर्णनात्मक कथाअंश देऊन काव्याचे 'भावगीत' पण हरवून बसले आहेत. अशा तऱ्हेचीं मिश्र पदे या काव्यांत सापडतात.

रासक्रीडेच्या आठवणींनी नायकाबद्दल प्रेमासक्ती चा भाव

**हरि बिना रही न सकुं मारी आली, वाहाले नेत्रबाण वींध्युं रे**
**चित्र चतुर्भुजी चोरी लीधुं, काहानडे कामण कीधु रे**
**मन मारू माधवजी स्युं बांध्यु , वहाली वेण त्रिभंगी वाह्यो रे.**

**जमुना तटि सरोवर छाया रास रमी गुण गायो रे**

( माझ्या मैत्रिणी, हरिशिवाय मी राहू शकत नाही. प्रियाने मला नयनबाणांनी जखमी केले आहे. चतुर्भुज हरीने माझे चित्त चोरले आहे. कन्हैयाने मला कामविव्हल केले आहे. माझं मन माधवाने कसे बांधून टाकले आहे. सूंदर बांसरी तीन प्रकारांनी वाजते आहे. यमुनेच्या तिरी वृक्षांच्या छायेत गुणगान करीत मी कृष्णाशी रास क्रीडा केली.)

खास करून शरदातील रात्रीच्या समयी सुयोग्य ठरतील असे राग, कंदार, कालेरी सामेरी मालव गोडी चा उपयोग करून वर्णनात्मक गीतांबरोबर आत्मलक्षी भावगीतें पण लिहीली आहेत.

**(२) वसंतनां पदु ( वसंतऋतुतील पदे )**

पूर्वी सांगितल्याप्रमाणे वसंत पंचमी पासून होळीच्या दुसऱ्या दिवशीच्या फूलडोळ (धुळवड) च्या दिवसापर्यंतच्या काळातली फागुन्लीला (वसंत ऋतुतील क्रीडा) ची अनेक गीते नरसिंहानी लिहिली आहेत. ही गीतें मुख्यतः 'वसंत' रागात निबद्ध आहेत. या गीतात वर्णनात्मक गीते आहेत. तशी आत्मलक्षीत भावगीतेही आहेत. या गीतांत विप्रलंभ (वियोग) आणि संयोग हे दोन्ही शृंगाररस मूर्त करण्याचा कवीचा प्रयत्न आहे. शरदऋतुतील लीला, चंद्राशी आणि रात्रीशी संबंधित होत्या तर वसंत ऋतुंतील क्रीडागीतांमधे, वन वनांतले वृक्ष आणि पळस, वगैरेतील, मन चाळवणारे रंग दर्शन देतात. पदे वर्णनात्मकच आहेत. पण नायिकेच्या तोंडी घातल्यामुळे सहजच मनोवेधक होतात.

**प्रथम दिवस व्रण वसंतपंचमी मध्य सखीधर शोहे**
**ते पाछष्य व्रज सुंदररियांरे माहारा बा लानुं मन मोहे**
**कंनक कलश पाट पथराव्यो वा' लाने पधराव्यो**
**अबलाए केश - माट भरयारे अभीनवि सेवा करायो**
**चिरंजीए तुं नाहोलिया रे कोडे वसंत रमिजे**
**नारसिंयाच्या स्वामी भले मलियो भामिनी भुवन भामिजे.**

(गोकुळातला वसंतपंचमीचा प्रथम दिवस आहे. कृष्ण मध्ये शोभत आहे. त्याच्या भोवती गोकुळांतल्या सुंदरी आहेत. त्यांना पाहून माझ्या प्रिय कृष्णाचे मन मोहित होते आहे. सुवर्ण कलश ठेवला. पाट मांडला आणि प्रिया ला (कृष्णाला) बसवले. नंतर केशमाट (केसांना सुगंधीत तेल माखणे केस विंचरणे भांग पाडणे वगैरे ) केले. अशी विषेश सेवा त्या सुंदरीनी केली. तूं चिरंजीव हो, आमच्या लाडक्या आणि मोठ्या कौतुकाने वसंत-क्रीडा कर रे- नरसिंहाच्या स्वामी तूं सुंदरीच्या घरी जाऊन तिला खुशाल भेट.)

वसंत ऋतूच्या आगमनाबरोबरच नायिकेची नायकाबरोबर विहार करायची आतुरता आणि आशा -

**चाल्य रमिए सखी मेल्य मथंक मही**
**वसंत आव्यो वन वेल फुली**
**मोरिया अंब कोकीळा कदंब लवे**
**कुसुम कुसुम रह्या भमर झुली**
**करो शणगार ने हार, गजगामिनी**
**क्या रयनी कहु छुं जो चाल्य उठी -**
**रसिक मुख चुंबिये वलगिए झुंबिये**
**आज तो लाजनी ग्राहि छुटी**
**हेत हरि वश करी, लाहोले उर धरी**
**कर ग्रही कृष्णजी प्रीत्य पलशे**
**नारसिओ रंगमां अंग उनम्द हशे**
**खोहेला दिवसनो खंग वलशे-**

(दही घुसळणे राहू दे ग, चल सखी, खेळूंया वसंत ऋतु आला. वन वेली बहराल्या आहेत. आंबा मोहरला आहे. कोकिळा कुहू कुहू करीत आहे. फुलांफुलांवर भ्रमर झुलत आहे. गजगामिनी नट्टा पट्टा कर, हार घाल, अग ती केव्हा पासून सांगते आहे. उठ आणि चल त्या रसिक कृष्णाचे चुंबन घेऊ, त्याला मिठी मारून ओठंगु. आज लज्जेची गाठ सुटली आहे. प्रेमाने त्याला वश करू, छातीशी धरायची संधी घेऊ (लाडालाडाने त्याला छातीशी घेऊ) कृष्णा. हात हातांत घेतलास तर प्रीती जोपासेल. नरसिंह अशा प्रणयरंगात अंगअंग उन्मद होईल. त्याच्या हरवलेल्या दिवसांची भरपाई होईल.)

आतां नायकाला वसंत क्रीडा करायची विनंती :

**वसंत रमिए रे मारा वाला वसंत रत्य छे रूडी**
**कानजी रे कांकणियो घडाओ, ज्यम खलकांनु चुडी**
**एक एक पाए अधिक माहारे लाखीणी चूडी**
**सामलियां शुं रंग भरय् रमतां दिशु छुं रूडी**
**यौवन विना मान नव्य लहिये कुंकुमना रंगरोल**
**नारसिंया या स्वामी भले मलियो, करशुं झाझमझोल**

( माझ्या प्रिया, वसंतक्रीडा करू या. वसंताची ही रात्र रमणीय आहे. मी बांगड्या जशा खळखळावते. अशी खळखळणारी कांकणे बनव ना रे. कान्हा एकाहून एक जरा मोठ्या अशा

माझ्या लाखेच्या बांगड्या आहेत. हे श्याम अगदी रंगात येऊन आपण वसंत क्रीडा करू- तेव्हा मी खूप सुंदर दिसेन. तारुण्य नसेल तर लाल रंगाची उधळण करण्याचा मान घेऊ नये. नरसिंहाचे स्वामी भेटले, फार आनंद वाटतो. आता अगदी आनंदच आनंद करू या.)

अशाच तऱ्हेचे होळी खेळण्यासाठी नायकाला निमंत्रण

**ओरा आवो अलबेला वाहाला रंगभरी रमिये होळी**
**तम साथे रमवाने आवी सरस बनीने टोळी-१**
**लाल गुलाल अबीर उडाडिये. नाखिये लईलई झोळी**
**कनकनी पिचकारी भरीभरी छेडिये केशर घोळी -२**
**तमारो वाद्यो करिये भीनो तेल फुलेल मां बोली**
**अमारी निलांबर साडी रसबरा करीये चोळी -३**
**बाहर माहर सरखां थई ऐ माहें माहें झकोळा**
**नरसैयाच्या स्वामी रंग रमता अबला ते बाल भोळी -४**

(अहो या, अलबेल्या प्रिया कृष्णा, आपण रंगात येऊन होळी खेळू या. तुमच्याबरोबर होळी खेळण्यासाठी मस्त टोळी बनवली आहे. गुलाल अबीर घेऊन हात भरभरून विखरु या. सुवर्णा च्या पिचकारीत केशर मिसळून, भरभरून शिंपू या. तुमचा अंगरखा आम्ही भिजवतो, तेलांत आणि फुलेलात- आमची निळ्या रंगाची साडी आणि चोळी तुम्ही ओलीचिंब करा. आंत बाहेर आपआपसांत मिसळून, आपण सारे एकसारखे एक होऊयां. नरसिंहाच्या स्वामीबरोबर भोळ्या अबलांनी क्रीडा केली.)

या काव्यात होळीत वापरली जाणारी गुलाल अबीर रंगाची पिचकारी, तेल, फुलें वगैरे सामुग्री आणि तिचा समयोचित उपयोग पण सांगितलेला आढळतो. यावरून ५०० वर्षाहूनही जास्त वर्षापूर्वी आजवर चालत आलेल्या रितीभाती प्रमाणेच होळी खेळली जात होती, हें स्पष्ट आहे. हा रिवाज ५०० वर्षे जुना आहे. हे आपण समजू शकतो.

'घरैया' व्हायचा रिवाज पण तितकाच जुना आहे हे खालील काव्यावरून दिसते.

**गुलाल भारिया गोविंदजी रे घरैया थई आवो**
**वसंतनी वरणासी करीने मारे ते मंदीर आवो**

(गुलालाने माखून गेलेल्या गोविंदा घरैया (सोंगाड्यानी घेरलेला ) होऊन ये. वसंत ऋतू चा थाटमाट करून माझ्या घरी ये.)

वसंत ऋतूचे हर्षभरीत होऊन स्वागत करण्याचा रिवाज आज भारतांत कुठे आहे की नाही, ठाऊक नाही, परंतु तसा भाव व्यक्त करणारे पद, पहायला मिळतेच.

**वसंत वधावा चालो जईये सजनी निराखिये नंदकुमार**
**श्यामसुंदरने मळी लईए मीठडां लईए वारंवार**
**कनक कलश मोर आंबानो श्रीफळ लो माथे लो थाळ,**
**लो चंदन चर्चो शरीरे पें रावता पुष्पना हार**
**अबीर गुलाल लो उराडवा नंद तणे दरबार**
**फगुवाने मिसे मोहनने वरसु ए आपणे निरधार**
**वागा ल्यो वहालाने पें रावना करो केशर छंटकार**
**नरसैयाना नाथने अर्थे सजोने सोळ शृणगार**

(सखी, चल वसंताचे हर्षभराने स्वागत करायला जाऊ. शामसुंदराला भेटू आणि वारंवार त्याची दृष्ट काढू (कानावर बोटे मोडून) आंब्याचा मोहोर सुवर्ण कलश घे, नारळ घे, डोक्यावर थाली घे अंगाला चंदन लावून घे, गळ्यात घालायला फुलांचा हार घे. नंदाच्या दरबारात उधळण करण्यासाठी अबीर आणि गुलाल घे, होळीचे निमित्त करून मोहनांवर वर्षाव करूं, हाच आपला निर्धार आहे. लाडक्याला (नंदकुमाराला) घालायला डगला घे, त्यावर केशर शिंपड नरसिंहाच्या नाथाप्रीत्यर्थ १६ शृगारांनी सजा.)

होळीच्या लाह्यांचा निर्देश ध्यान आकर्षून घेतो. वसंत क्रीडेनिमित्त अशा अनेक पदांचे आयोजन केलेले दिसते. हुबेहुब प्रसंग चित्र उभे करायची कवीची प्रतिभा, सर्वत्र अनुभवास येते.

**( ३ ) हिंडोळान्ना पद ( झोपाळ्यावरची गीते )**

यापूर्वीच आपण पाहिले आहे की 'वर्षाऋतूंत, वनातल्या वृक्षांना झोपाळे बांधून तिथे श्रीकृष्ण आणि गोपींचा विहार' हा या प्रकारातील काव्यांचा विषय आहे. वर्णनात्मक पदांत, परोक्ष चित्रण असते, तर भावगीतांत पात्रे स्वतः मी पणाने भाग घेतांना अनुभवास येतात ।

**हिंडोले तो हींचु मारा वाला अमने घुमण चलाव रे ।**
**घुनणडी घालीने मारा वाला प्रेमे शुं बोलावे रे ।**
**हिडोळे तो हिंचु नारा वा'ला घूमण घाली लांबी रे ।**
**पडखो पडखो मारा वा' ला शंभारू पगनी कांबी रे**
**पालव छुटे चीर वछुटे वेण उघाडी थाए रे,**
**पडखो रे पडखो मारा वा 'ला हींडोले न रैहवाय रे ।**
**तमारे पितांबर, अमारे चीर वा 'ला आपण बेहु बांधेशु रे**
**तमे नानडिया हुं नानकडी, नवनवा रंग रमेशु रे ।**
**आंबा डाले-सरोवर पाले शहियर रमतो रंग लागोरे ।**

**आवो रे आवो शाहेली कांन कनै कांई मारो रे ।**
**चुआ चंदन ने कस्तुरी छंटावो लई अंगे रे ।**
**आवो रे आवो शाहेली, काहाना सुं रमिये रंगे रे ।**
**श्रावण केरी मध्य श्रवणी रे हींची हींची छाया रे**
**नारसैयाच्या स्वामी भले मलिया. श्री गोकुल केरो रायारे**

(झोपाळ्यावर तर झोका घेते.माझ्या राजा (प्रिय) आम्हाला गोल गोल फिरव.फुगडी घालून माझ्याशी प्रेमाने आणि स्नेहाने बोल. झोपाळ्यावर तर झोके घेते, प्रिय (कृष्णा) मोठा लांब गोल झोका दे. लाडक्या ,मदत कर रे मदत कर. माझ्या पायांतल्या कडा (दागिना) मी संभाळते. पदर पडतो आहे,साडी निसटते आहे,वेणी उघडी पडते आहे. माझ्यापाशी सोबतीला ये,मदत कर रे राजा झोपाळ्यावर तोल संभाळला जात नाही. तुमचे पितांबर आमच्या साड्या दोन्ही आपण बांधून टाकूं. तुम्ही छोटेसे मी छोटीसी नव्या नव्या रंगानी खेळुयां आंब्याच्या डहाळ्या सरोवराचे किनारे, मित्रा खेळतांना रंगून गेले. ये ना ग ये माझ्या मैत्रीणी, कन्हैयाजवळ कांही माग ना चुआ. चंदन आणि कस्तुरी घेऊन अंगावर उडवून धे, ये ये सखी काय रंगात येऊन कान्हा खेळतो आहे- श्रावणांतली ही वनक्रीडा पौर्णिमेपर्यंत झाली. नंतर वाऱ्याने झाडाच्या छाया झोक्यावर झोके घेऊ लागल्या नरसिंहाचे स्वामी भेटले. फार आनंद वाटला . त्यानी ही क्रीडा श्री गोकुळात केली.

झोपाळ्यावरच्या या क्रीडा गीतांत चुवा वगैरे ,साधनांचा पण निर्देश केला आहे. अखेरीस पूर्णतृप्तीचा भाव पण दर्शविला आहे. अशी आत्मलक्षी पदे थोडीशीच पहायला सापडतात. वर्णनात्मक पदांची विपुलता आहे.

(४) दाणना पद (दान -पदे)

मथुरेला दही ताक विकायला जाणाऱ्या गोपींना रस्त्यांत अडवून दाण (जकात) मागायच्या बहाण्यांनी त्यांच्याशी 'प्रेमगोष्टी करणे' हा या पदांचा विषय आहे. संस्कृत साहित्यांत अथवा प्राकृत अपभ्रंशातही हा विषय कुठेही आढळत नाही. हा प्रकार नरसिंहाना कुठून प्राप्त झाला, हा प्रश्नच आहे. यांचे, ३९ ओव्यांचे 'दाणलील' हे खंडकाव्य आहे. त्याच्या उत्तरार्धांत श्रीकृष्ण-राधेचा दाणा 'जकात' चें निमित्त करून एक संवाद आहे. या दाण गीतावलीत वर्णनात्मक पदें फारशी ज्ञात नाहीत. भावगीते तर जवळ जवळ नाहीतच. इथे दिलेली पदें ग्रंथकारानी प्रसिद्ध केलेल्या संग्रहात सापडत नाहीत. दोन्ही तऱ्हेच्या पदांत मुख्य भाग संवाद आहे, हा खालील 'संवाद' हेच स्पष्ट करीत आहे-

**आडुं कोई नथी बोलतो, देने दाण तुं मारुं ।**
**नैं तो विखास्ये वाटमे मैं आडुं तारुं -१**

गरब भरी तुं गुजरी जोबननी माती
दां'डि दां'डी सौ देखनां दाण चोरीने जाती -२
कें जे तुं जईने कंसने दाण लागे ते दैने,
मोवड आवे मानिनी, वे 'लि दल लेने -३
करिये नैं झाझी का' न जी परनारीनी हांसी
बल तो तमारूं जाणिये, आव्या छो नासी -४
दा 'डी अगे आई चालिये, दाण केदी ना दिधुं-४
खोस्या मा ठाला आवरू, कैय छैय सीधुं -५
लाड्कवाया लालजी, एलफेल म बोलो
नरसी मे तो केहे, जोरावरि सीद बाझता डालो -६

(मी आडवे तिडवे काही बोलत नाही. तूं माझे दाण (जकात) दे, नाहीतर मी तुझ्या वाटेत तुझ्या आड येईन.(१) तुझ्या तारुण्याची माती फारच गर्विष्ट आहे. हे गुजरी तूं सर्वांच्या समक्ष माझे देणे (दाण) चोरून पळते आहेस (२) जाऊन सांग कंसाला इथे जकात द्यावी लागते म्हणून. (गोपींचे) दल घेऊन पुढारी बनून मानिनि, घाई घाई येतेस हं (३) राग संताप आणि पर स्त्रीयांचे हंस करू नको. कन्हैया तुझा पराक्रम तर आम्हाला ठाऊक आहे. पळून आला आहेस तो(४) आजवर ही जकात आम्ही कधी दिली नाही. आम्ही अशाच जलद चालणार. बाजूला हो, फुकट अब्रू घालवूं नको, सरळ सरळ तुला सांगतो आहोत, लाडालाडाच्या बाळा, भलते सलते बोलूं नको ? नरसिंह महेता म्हणतात, कशासाठी जोरदार बाचाबाची, फुकट घालवता अहात ?

खालील पदांत नायिकेचे नायकाबद्दलचे प्रेम तिच्या भावपूर्णतेचे सुचवले गेले आहे:

उभो रे' ने रे गोवालिया, तारी मोरली मीठा वाय
छेल छबीला नंदना तुं तो गीत मधुरा गाय।
एवा नमणा न थईए, नाथणी तमने नंदबावानी आण
मधुरी -सी वाय मोरली तो आपुं महीनां दाण
सजनी चाल चतुरो जोईने मारां नेनां निरमल थाय
नाची देरवाडो नाथजी मारां भवना पातक जाय।
कामण टुमण तारा दिलमां भरियां आंखडीमां छे जंत
वश कीधी व्रजवनिता एवां क्यां सीख्या त्ता मंत्र ?
मारा सम जो मने न सीखव्यो तमे जाणो सर्वे पेर
सोझ सवारे। सामला, तमे आवजो मोरे घेर-
तुं तो नंद लणे नानडियो ने कान'जी तारु नाम

**दाण लीधांना खप करो तो आवजो गोकूलगाम-**
**राजनुं मुख दीठडे सुख उपजे तमे घणी राखो छो में 'र**
**नरसिंना स्वामी सामला तमे करणे लीला ले'र**

(ए गवळ्या, जरा थांब ना, तुझी मुरली गोड वाजवत आहे. मस्त गोंडस (छेल छबीला) पोरा, तूं तर मधूर गातोस. महाशय तुम्हाला नंदबाबाची शपथ, एवढे नम्र नका होऊं ! मधुरशी मुरली वाजवाल, तर दह्याचे दान (जकात) देईन - चतुरा तुझी राजस चाल पाहून माझे डोळे पवित्र होताहेत. महाराज , नाचून दाखवा, माझी जन्माची पातके नष्ट होतील , तुझ्या मनांत मंत्रतंत्र भरले आहेत. आणि डोळ्यात वशीकरण गोकुळातल्या स्त्रीयांना वश केले. हा मंत्र कुठे शिकलात ? तुम्हाला सर्व कांही ठाऊक आहे, ते मला न शिकवाल तर तुम्हाला माझी शपथ. संध्याकाळी सकाळी, श्यामसुंदर माझ्या घरी तुम्ही या- तूं तर नंदाकडचा छोटा आणि कन्हैया तुझे नाव घेतलेले दान (जकात म्हणून) संपवून टाकाल तर गोकुळांत या - कृष्णाचे दर्शन होते. त्यामुळे खूपच सुख मिळते. तुम्ही खूप कृपा ठेवता अहात. नरसिंहाचे स्वामी शामसुंदर, तूम्ही आनंद (लीलातर) करा.)

अशा प्रसंगात कवीने श्रीकृष्णांच्या मुखानेही वदवले आहे-

**उभी रे 'ने मैं वाली, चाली जाय छे क्यां चरित्राली ?**
**वाटे लाथे दाण अमारूं तेमां लेशूं नै 'हु तारुं**
**प्रिती रीते मैं हु पाने, मटुकी मूक्ती वूही जाने**
**गुजरी, गर्वभरी तुं घेली, चोरी दाण तणी नै'सेली**
**नरसी महेता केहे, मटुकी लैने मेलिस घेर सिखामण दैने ?**

(दही वाली, थांब ना चाललीस कुठे, चरित्रवाली (किंवा चरवी वाली) या वाटेने दान द्यावे लागते. ते गान म्हणून आम्ही तुझे गोरस घेऊ. प्रेमाने तूं आम्हाला गोरस पाज. ही मटकी ठेवून निघुनजा. दानाची जकात सहज चोरी करून जाऊ पहातेस. नरसी मेहता म्हणतात, तुझी मटकी घेऊन मी तुला धडा शिकवतो आणि घरी पोचवून देतो,

भालण कवीच्या दशमस्कंधांत पण दाण'ची असंख्य पदे, भालणकवीचीं आहेत. नरसिंह आणि भालण कवींच्या पूर्वी पासूनच देशात 'दाणलीला' वर्णन केली जात होती असे स्पष्ट दिसते. वज्रभाषेत साहित्य रचले गेले, त्या काळांतला भालण कवी 'खरा-पण नरसिंह त्या काळतील नव्हते. म्हणून, भारतांत, 'दाणलीला' वर्णन करणारा प्रथम कवी नरसिंह म्हटले पाहिजेत.

**(५) शृगांरमाळांना पद ( शृंगार गीतांची माळा )**

'शृंगार माळा' या शीर्षकाखाली नरसिंहानी पदसंग्रह बनवला नाही. निरनिराळ्या क्रीडा-गीतांमधे ज्यांचा समावेश नाही आणि जी गीते स्वतंत्र क्रीडागीते - विहार गीते म्हणून

वर्णन केली आहेत. तसेच आत्मलक्षी प्रकारांतली जी शेकडों गीते सापडली आहेत. ती सर्व गीते एकत्र करून स्व.इच्छाराम् सं. देसाई च्या,नरसिंह मेहता कृत काव्यसंग्रहात 'शृंगारमाळा' या शीर्षकाने दिली आहेत.

त्यांची संख्या ५४१ आहे. यांत 'रास' चीं जीं पदें होती, ती मी (लेखक स्वतः) 'रास सहस्रपदीना समुद्धार' मधे वेगळी काढली आहेत. याखेरीज नंतर मिळालेलीं पदे स्व. देसाई नी 'न. मे. काव्यसंग्रहाच्या', परिशिष्टात दिली आहेत. माझ्या माहितीत असणाऱ्या अप्रसिद्ध गीतांची संख्या कमी नाही. इथे आत्मलक्षी प्रकारांतली पदे, भावगीतांतून बाजूला काढायचा प्रयत्न आहे. ज्यात नरसिंहाची 'प्रतिभा' पहायला मिळते. वियोग आणि संयोग दोन्ही प्रकारांतला शृंगार यांत वर्णीला आहे. विप्रलंभाचे हे पद-

**मारो नाथ न बोले अबोला मरिये रे**
**हुं क्यम करी वेठुं वियोग ? हवे शुं करिये रे ?**
**सांभळ सहियर विनवी आ दुःख केम सेहेवाये रे ?**
**मेली गया मुने गा'वजी मारो जन्मारो क्यम जाये रे ?**
**शेरडीए सामो मळे तो वाट मरोडी जाये रे,**
**ऊंचु जोउं त्यां नीचु जुए मळवाने विमासण थाये रे**
**मोर मुगुट पीतांबर सोहिये कुंडल झळके कान रे**
**नरसैयाच्या स्वामी मल्यो रे वहाले, वाह्यां अमारा वान रे**

(माझा नाथ (कृष्ण) कांही बोलत नाही, त्याच्या अबोल्यामुळे मरतो आहोत. हा वियोग कसा सहन करायचा ? आतां करायचे तरी काय ? सख्या ऐक माझी विनंती. हे दुःख कसे सहन होणार रे ? मला माझा माधव मला सोडून गेला. माझा जन्म कसा जाणार.

(एखाद्या) बोळीत समोर भेटला तर वाट बदलून जातो. मी त्याच्याकडे वर पाहिले तर तो खाली पहातो (दृष्टीस दृष्टी देत नाही); त्यामुळे भेटायला मला संकोच वाटत आहे. मोर मुगूट पितांबर शोभतो आहे. कुंडले कानांत झळकत आहेत. नरसिंहाचे स्वामी भेटले. प्रिय कृष्णाने आमची अब्रू राखली.

शेवटच्या ओळीत संयोगभाव सांगितला आहे. पुढील पदांत संयोगरसांचे सुख वर्णन करीत आहेत ।

**वांसलडी वाहाते महारे वहाले सामुं जोयुं रे ।**
**लटके बांहुडी झाली मारी त्यम मारुं मन मोह्युं रे.**
**कंठ विलागी वहालजीएने मंदिर मांहे लावी रे ।**
**मननां मोहन माये महारे, आरती अगर उवारी रे ।**

प्रेमे धरी बेसारियो में सोव्रण-पाट ढळावी रे
व्हाला केरुं वदन नेहाली। भामकडे हुं चाली रे
गाय दोहिने दूध कढुं सरसी शाकर भेलुं रे
भणे नरसैयो पान करे हरि, वलजी उरपर भेलुंरे -

(मुरली वाजवीत असताना माझ्या प्रिय कृष्णाने समोर (माझ्याकडे) पाहिले. रसिकपणाने माझे हात धरले आणि माझे मन मोहून गेले. माझ्या गळ्याला मिठी मारून कृष्णाने मला मंदिरांत नेले. माझ्या मनांत मोहन राहतो. मी त्याला धुपारती ओवाळली. सुवर्णाचा पाट सरकवला आणि मोठ्या प्रेमाने मी त्याला हात धरूंन बसवला. कृष्णाचे मुख मी निरखून पाहिले आणि गाय हंबरल्यामुळे मी निघाले. गायीला दोहवून मी दूध काढले. त्यात चांगली साखर मिसळली. नरसिंह म्हणतात, हरि पितो आहे. तो वलजी (दूध) मी त्याला माझ्या हृदयात सामावून घेतले.

वियोगात पण संयोगाच्या आनंदाचा अनुभव -

सुण सजनी सूता मोहे झबकीने जागी
जाण्युं म्हरा वांलाजी ने कंठडे विलागी
अती रंग कीधा, अध रस पीधो
सेजडी उपर थया सतो, व्हाल्हो उप पर लीधो, -
सहीसमाणी, म्हारुं स्वरूप न विचारो
नरसैंयान्यो स्वामी मारा मंदिरिये पधारो

(ऐक सखी, झोपेतून मी खडबडून उठले. मला कळले. मी माझ्या प्रिय कृष्णाच्या गळ्याला मिठी मारली आहे. खूप प्रणयरंग केला, ओठांचे अमृत मी प्यायले. शय्येवर असलेल्या कृष्णाला मी हृदयाशी घेतले. सखी गं, माझ्या त्या स्वरूपाचा विचार करूं नकोस-नरसिंहाचे स्वामी माझ्या मंदिरांत आले.)

असाच भाव दर्शविणारे -

आंखलडीथी न करूं अळगो, म्हारा जीवनप्राण रे
हृदया सरसो भीडी राखुं सामालियो सुजाण रे
रातदिवस म्हाले मंदिरमां, त्यम् म्हारुं मंदिर मोहुं रे
मचको करीने आगळ आवुं व्हाले सामुं जोयुं रे
दुध कढियल घसमसती लावुं शाकर सरसुं पीये रे
हार कुसुमनो कंठे घालुं जेम हुं हरखुं हैयेरे
मनगमतो शणगार करिने कर दरपण लई देखाडुं रे

**भणे नरसैयो-मान करीने शणगटडो संकोरुं रे**

(माझ्या नजरेपासून दूर करणार नाही, तो माझा जीवन प्राण आहे. शहाण्या शामसुंदराला मी हृदयाशी घट्ट धरुन ठेवीन. रात्रंदिवस तो माझ्या मंदिरांत मौज करतो. तसंतसे माझे मंदीर मोहून जाते. मुरका मारीत मी पुढे आले. (तर प्रिय कृष्णाने समोर (माझ्याकडे) पाहिले. मी लगबगीने गरम दूध, झकास साखर घातलेले आणले, आणि कृष्णाने ते प्यायले. फुलांचा हार त्याच्या गळ्यांत घातला आणि माझे मन आनंदून गेले. मनपसंत शृंगार करून हातांत आरसा घेऊन त्याला दाखवले, नरसिंह म्हणतात त्याला सन्मान देऊन शृंगार आटपता घेतो.)

**६. चांदलानां पद (चंद्र तद्वत सौभाग्य तिलकांची पदें)**

स्व. इच्छाराम देसाई नी 'शृंगार माळाच्या पदांत' ११ पदांचा समावेश केला आहे. दुसरी तीन एक नवीं पदें माझ्या न. मे. पदांत छापली आहेत. जास्त संख्येत तीं पदें नाहीत - जी आहेत ती बहुतेक वर्णनपद आहेत. तरीपण आत्मलक्षी पदेही सापडतात. जशी-

**चांदलो शाहे भ्रगानयणी वालाजी शुं रंगभरय रमिये रेणी**
**टीली कीधी कुंकुम केरी, झाल्य झबुके काने,**
**प्रेम धरिने वदन निहाळुं कंठ बळगी का ने रे,**
**नाना भाव धरुं पियु साथे करती केलीविलास रे,**
**नरसैयाच्यो स्वामी भले मालियो पूरी मारा मनडाती आसरे**

(मृगनयनी चंद्र शोभतो आहे. कृष्णाबरोबर, रात्री आनंदमय क्रीडा करूंया. कुंकवाची टिकली लावली आहे. कानात कर्णफुले चमचम करताहेत. प्रेमानें कृष्णाकडे पाहतें आणि कन्हैयाच्या गळ्याला मिठी मारते -१ प्रियकराबरोबर नाना भावनांनी राहते आणि क्रीडा विलास करते. आनंद झाला नरसिंहाचे स्वामी भेटले. माझ्या मननांतली आशा सफळ झाली.)

**"चांदलो घूंघटडामां झलके" ते जोईने पियुंनु मन चलके १ ।**
**कंठ धरी बेहू बांदालडी रे दरपण मांहे निहालु रे २ ॥**
**ज्यम ज्यम रीझे शामालियां रे त्यम त्यम संगे भालुं रे**
**रोजडिए सुंदर वर पामी वामी वेदना भारी रे**
**नारसियाच्या स्वामी रोज शुहाव्यो, राखिश उर पर धारी रे ३ ॥**

(घुंघटातून माझ्या कुंकवाची टिकली चमकते. आणि ती पाहून माझ्या प्रियकराचे मन चळते. दोन्ही हातांनी गळ्याला मिठी मारून मी आरशात निरखून पहाते. श्यामसुंदरचे जसे जसे मन रमते, तसतसे त्याच्या बरोबर मी आनंद करते. असा सुंदर स्वामी प्रतिदिन मला भेटतो आणि माझ्या वेदना कमी होतात. नरसिंहाचे स्वामी रोज मला सौभाग्यदान करताहेत. त्याना हृदयाशी धरूंन ठेवीन)

हा चांदलो (कुंकुम टिकली) तर सौभाग्यवतीने आपल्या कपाळावर केलेला आहे. परंतु आकाशातील चंद्राला उद्देशुन संबोधन केलेले पहायला मिळते:-

**थिर थिर चांदला म करिश वेंणु प्राणजीवन घेर आव्या.**
**वालि वालि अवतार धरीने पूरण पुण्ये पाम्यां रे**
**चांदो शाह्य चांद्रणिये रे, ज्यम सरोवर शोह्ये वेण्यरे**
**गोविंदो शोभे गोरणिये, ज्यम हंसागवनी हे त्य रे-**
**बापइडो पियु पियु करे रे कोयल मधुरी वाशे रे**
**हुं तुजने वारूं कुरककडा रे, रखे तुं वयण प्रकाशे रे,**
**शाह्यर शोहे लेहेरडिये लेहरे लेहेरतरंगा रे,**
**नरसियाच्या स्वामी भले मालियो गोपीवर गोविंदा रे ।**

(चंद्रा, थांब थांब पहाट करूं नको. माझा प्राणजीवन (कृष्ण) घरी आला आहे. परत परत जन्म घेऊन पूर्ण पुण्याईने मला हा मिळाला आहे. चंद्र चंद्राणीसह शोभतो आणि सरोवर वेलवेलीनी. गोविंदा गोपी (राधा) बरोबर शोभतो आणि स्त्रीला हसंगती शोभते-बापैडा पक्षी 'पियुं पियुं' करतो आहे आणि कोकीळा मधुर गात आहे. कोंबड्या मी तुला मना करते आहे. राहुं दे पहाटेचा प्रकाश (तूं आरवुं नको !) कवी काव्यलहरींनी शोभतात. आणि काव्यलहरी आनंदतरंगांनी शोभतात. नरसिंहाचे स्वामी गोपीधर गोपाल भेटले, फार आनंद वाटला.'

'इंदू ,उतावलो या रखे आकलो ' आणि 'हे रहे रे चांदला, मान मागूं ' ही यां प्रकारची गीते आहेत.

हे नीट समजून घेतले पाहिजे की न्याहायच्या वेळी हे परलक्षी वर्णनात्मक गीत आहे, की या भावांच्या आविष्काराचे हे आत्मलक्षी भावगीत आहे. अशी कोणतीही भेदरेषा नरसिंहाच्या मनात होती, असे मानायचे कारण नाही. त्यांच्या हृदयातून काव्यवाणीचा ओघ वहातो आणि त्या त्या वेळी दोन्ही प्रकारच्या, कधी वेगळ्या वेगळ्या, कधी मिश्र अशा काव्यरचना बनत जातात. व्रजभाषेचे अष्टछाप आणि इतर भक्तकवीच्या मनोगतांतून जसा कीर्तनप्रवाह वाहात राहिला होता, तसाच प्रकार नरसिंहाच्या बाबतीत पहायला मिळतो. भालण कवींची पदें पहातांना आपल्याला हा अनुभव जरूर येतो; परंतु एक 'सर्वतंत्र स्वतंत्र' कक्षेचा कवी आहे तर दुसरा अमूक चौकटीत बांधला गेलेला कवी आहे. हे नक्की सांगू शकतो की दोघांनाही शास्त्रीय रागांची माहिती आहे, आणि त्या त्या वेळच्या त्या त्या रागांची त्याना उत्तम समज आहे.

# ६. नवनवोन्मेषशाली कवी

नरसिंहाच्या काव्यप्रतिभेचा उत्स्फूर्त आविष्कार कसा होत गेला ते आम्ही मागील प्रकरणांत सोपे करून सांगितले आहे. ११व्या १२ व्या शतकापासून सुसंस्कारीत भारतीय भाषा घुसळल्यासरख्या झाल्या आणि सर्व भाषीय साहित्यरचनांना एक प्रकारची गती आली. बंगाल बिहार, उत्तर प्रदेश, विशाल राजस्थान, गुजरात, मध्यप्रदेश, आणि महाराष्ट्रांत अशा प्रकारच्या भाषारचना वापरांत येत होत्या. मुख्यतः जैन रचना व्यवस्थित संभाळून ठेवणाऱ्या भांडारांमुळे, विशाल राजस्थान, गुजराथ च्या रचना मोठ्या प्रमाणात संभाळल्या गेल्या आहेत. दुसऱ्या ठिकाणी सर्व रचना संभाळल्या गेल्या नाहीत. निरनिराळ्या राजवाड्यांतून, राजाश्रय मिळालेल्या कवींच्या रचना संग्रहीत केल्या गेल्या, परंतु विदेशी आक्रमणांमुळे जिथे जिथे सत्तापालट झाला, तिथे तिथे मोठ्या प्रमाणांत साहित्याचा नाश झाला, त्यामुळेच साहित्याची विपुलता पहायला मिळत नाही. जयदेवांचे गीतगोविंद प्रथम स्थानिक भाषेत होते. आणि नंतर ते संस्कृत भाषेत संस्कारीत झाले असा अभिप्राय सुप्रसिद्ध भाषातत्त्वज्ञानी डॉ. सुनीतिकुमार चॅटरजीनीं दिला आहे. १३ व्या शतकांत 'गीतगोविंद' चा व्यापक प्रसार झाला. थोड्या कालावधीतच उत्कल (आरिसा) पासून तो थेट गुजराथपर्यंत 'गीतगोविंद' चा प्रसार झाला. या नंतरच्या विद्यापतींच्या रचना, कांही कारणास्तव कां होईना पण जपून ठेवल्या गेल्या. महाराष्ट्रात साहित्याची जपणूक बऱ्याच प्रमाणांत झाली. महनुभाव संप्रदायाच्या कीर्तन रचना आणि नंतर वारकरी संप्रदायाचे ज्ञानेश्वर आणि त्यांचे शिष्य नामदेव, या दोघांच्याही रचना सुरक्षित ठेवल्या गेल्या, उलट गुजराथमधे जैन साहित्य सोडून इतर जुन्या रचना जपलेल्या नाहीत. जपणूक झाली ती लौकिक कथाप्रकारच्या रचनांची जसे असाइतची 'हंसाउली' आणि भीमाची (सदयवत्सलकथा) अशा रचनाची जपणूक जैन भंडारामुळे झाली. नरसिंह महेतांच्या पण सर्व रचना संभाळाल्या गेल्या असे म्हणायला आपल्यापाशी काही पुरावा नाही. यांच्या जवळच्या उत्तर समकालीन आणि उत्तरकालीन साहित्यकारांच्या रचनांच्या पोथ्या मिळाल्या आहेत. तर नरसिंहाच्या त्यांच्या नंतर सव्वाशे दिडशे वर्षानंतरच्या पोथ्या मिळाल्या आहेत. त्यात फारश्या

रचनाही नाहीत. कारण स्पष्ट आहे. यांच्या जीवनकालांत आणि नंतरही लोकांच्या उपयोगांनुसार, यांच्या रचनांच्या नव्यानव्या नकला केल्या गेल्या आणि जुन्या पोथ्यांची दरकार राहिली नाही. या नव्या नव्या नकलांमुळेच, नरसिंहाच्या रचना अजूनपर्यंत बऱ्याच अंशी सुलभतेने उपलब्ध आहेत. या रचनांमधे नरसिहाच्या अद्भुत कवी प्रतिभेचे सहज दर्शन होते.

नरसिंह भक्त होते.भालण कवीप्रमाणे त्यांचे कवित्व आगंतुक नव्हते, परंतु सहज होते. यांच्या अनेक पदांमधे लिहितां लिहीतां ते, त्या त्या प्रसंगात सहभागी झाल्याचे आढळून येते. हे त्यांच्या उत्कट तन्मयतेचे द्योतक आहे. तसे पाहिले तर नरसिंहाचा मुळपिंड भक्तकवीचाआहे आणि कवी असल्यामुळे यांचा स्वाभाविक कल 'रसा' कडे आहे. यांच्या काव्यांत सहजपणा आहे. परिश्रम नाहीत. रस आणि अलंकार यांच्या व्यवस्थित मांडणीचा, यांनी विचार केला नाही ते स्वाभाविकपणेच, यांच्या काव्यांत येतात. शृंगाररसाचे तर नरसिंह स्वामीच आहेत. श्रीकृष्णलीलेच्या काव्यांत त्यांनी विप्रलंभ आणि संयोग या प्रकारांची रेलचेल केली आहे. विप्रलंभ शृंगारांत नायकाच्या गैरहजेरीतला वियोग आणि त्याच्या हजेरीत ही वियोग तर संयोग शृंगारांत नायकाच्या प्रत्यक्ष हजेरीत पण संयोगाचा आनंद आणि गैरहजेरीत पण संयोगाचा आनंद असे चारी प्रकार त्यांनी वर्णिले आहेत. इतर रसांपैकीं हास्य 'करुण' अद्भुत बीभत्स आणि शांत हे रस त्यांनी प्रसंगोपात वर्णन केलें आहेत. हास्य हे खरे आहे कीं नरसिंहाना 'हास्य' रसाची तशी कुठेही जरुर वाटली नाही. क्वचित असा एखादा प्रसंग त्यानी हस्तगत केला आहे.

**भोळा भोळा शंभु तमने विश्व वरवाणे रे**
**मूळनी वातो तमारी कोई नव जाणे रे।**
**जोगिंद्रपणु शिवजी ने तमारुं जाण्युं रे**
**जयमां घालीने शिवजी क्यांथी तमे आणि रे ?**
**पीळी पटोळी ने अंगे छे गोरी रे**
**सीदने छुपावो शिवजी छती थई छे चोरी रे**
**ना रे मानो तो शिवजी जराओं छोडो वुं रे**
**जटा माथी बीकले तो करी ना बोलवुं रे**
**भभुन चोळीत शिवाजी वाल्यां आडा आकरे**
**एक एवा लक्षणे पाणी न पाऊं टाक रे**
**आंकडो धंतुरो शिवजी विजयाना भोगीरे**
**महेता नरसेंयाने स्वामीना तमे जूना छो जोगी रे**

(शंकर मोठे भोळे म्हणून सर्व जग तुमची स्तुती करते. पण मुळांतली गोष्ट काय आहे हे

कोणालाच ठाऊक नाही. शंकरा, तुमचे योगीपण मला कळले आहे. तुमच्या जटांत घालून हें तुम्ही कुठून आणले आहे ? कोणी आपल्या मागे घालून जाणते, कोणी हाताने धरून आणते, तुम्ही शंकरा, डोक्यात घालून ही कुठून आणलीत. पिवळी पटोळी साडी नेसली आहे आणि गोरी आहे, कशासाठी लपवता अहात शंकरा. तुमची चोरी तर उघडकीस आली आहे. तुम्ही मानीत नसाल शंकरा, तर तुमच्या जप मी सोडतो, जटांमधून निघेल तर या पुढे मी तुमच्याशी बोलणार नाही.(मानणार नाही). भस्म चोळून शंकरा तुम्ही अगदी कमाल केलीत. अशा तऱ्हेच्या तुमच्या लक्षणामुळे तुम्हाला एक टांकभर पाणी सुद्धा मी पाजणार नाही. चिमटा धत्तुरो ठेवणारे तुम्ही शंकरा, यशस्वितेचे तुम्ही भोगी आहात. नरसिंह महेतांच्या स्वामीचे तुम्ही जुने योगी आहात.

**करुण**

नायकाच्या अगर नायिकेच्या तसेंच नातेवाईकांच्या अगर संबंधिताच्या मृत्यूमुळे जे वातावरण निर्माण होते. त्यात करुण रस मूर्त होऊ शकतो. विरहाची तीव्रता नसावी आणि मीलनाचा योग यावा तिथही करुण रसाची आशा करणे बरोबर नाही. म्हणून नरसिंहच्या रचनामध्ये करूण रसाची आशा करणे बरोबर नाही. एकाच प्रसंगात करुणरसाची शक्यता आहे. जिथे नायक जगांत-आहे पण वियोग कायमचा आहे. गोपींना कायमचे सोडून श्रीकृष्ण मथुरेला राहू लागले तो प्रसंग गोपींचे सांत्वन करायला श्रीकृष्णानी उद्धवाला पाठवले तेव्हां गोपींनी जो 'निरोप' पाठवला आहे त्यांत करुणरस मूर्त झाला आहे.

**आधव कहेजो रे हरिने एटलुं रे के अमने तमारो आधार.**
**विखंडा पाईने रे वाहरी जी शे न गया रे के दुख देखाड्यां दीनदयाळ**
**दुखडानी दाझी रे ओधव देह केम वले ' हरिविना हाळी हइडा मोह**
**रे व्रेह तण भडका रे ओधव, बेसमे रे के बळवंत आवई झाले बाहे**
**माहरा मन विशे रे हरिनी दास छु रे के घगां तमो साधो मानव सार**
**के जीवो तेने जोवा आवजा रे के मुआ पछी ले जो रे संभाल**
**के साधुवे वळावीने रे ओधव, आविया रे मथुरा नगरानी मोझारय**
**गोपीजन नित्ये रे नरसैया स्वामीने कहिये रे के नयणे वहे आंसुडानी धार**

(उद्धवा, हरिला एवढेच सांगा) की आम्हाला तुमचा आधार आहे. प्रिय कृष्णा, तूं अलग झालेला अनुभवून आमचे जीवनच संपल्यासारखे झाले, (हरीला सांगा) की दीनदयाळा तूं आम्हाला दुःख दिले आहेस. उद्धवा, दुखावल्या गेलेलो आम्ही करपून गेलो आहोत. देहाची कशी स्थिती झाली आहे. (त्याला सांगा) की हरीशिवाय ह्रदयांत होळी पेटली आहे. उद्धवा सांगा की जखमेत नुसता भडका उडत आहे, बलवंता (हरी) येइल आमचा हात धर आणि

आम्हाला उल्लसित कर. मी हरीची दासी आहे. हीच भावना माझ्या मनात आहे रे, तुम्ही मानव जन्माचे कल्याण खुशाल भरपूर साधीत रहा सांगा तुझ्या दर्शनासाठी जीवित आहेत. त्यांना भेटायला ये आणि नाहीतर सांगा मेल्यावर सांभाळ कर. उद्धवा त्याना सांगा साधु माणसाला इकडे वळवून तुम्ही मथुरा नगरांत मौज करायला गेलात. नरसिंहाच्या स्वामीना सांगा गोपीच्या डोळ्यातुन सतत आसवांची धार वहात आहे.)

नरसिंहानी आत्मचरित्रपर काव्यांत करुणतेचा मामुली स्पर्श असलेले अनेक प्रसंग वर्णन केले आहेत. जसे मामेरू काव्यांत पित्याच्या गरीबीचे मुलीने केलेले वर्णन विवाह काव्यांत दीक्षित गोर जुनागडला येऊन सामळदासांची सगाई जमवून आल्याची बातमी सांगताना आणि मदन महेता त्यांची पत्नी दोघेही घरणीवर कोसळतात तिथे मदनमहेताच्या पत्निने केलेला पश्र्चात्ताप दीक्षित गोर ने लग्नाची निमंत्रणपत्रिका देतांच माणेक महेतांचे लग्न कसे पार पडेल त्याचे दुःख निरनिराळ्या प्रसंगी सहाय्य करण्यासाठी नरसिंहानी केलेली काकुळतीची प्रार्थना आणि सुदाम चरित्रात त्याच्या पत्नीने सुदामाला दिलेली प्रेरणा हे ते प्रसंग आहेत. या प्रसंगात करुण रस नाही म्हटलं तरी चालेल फक्त औत्सुक्य ग्लानी अशासारखे मनांत उभरलेले भावच आहेत.

**अदभुत** - आत्मचरित्रपर काव्यांत थोड्या अधिक उच्च कक्षेने, हा रस व्यवस्थित दिलेला आहे. अर्थात कुठेही या रसासाठी खास प्रयत्न केलेला नाही.

**बीभत्स** - वीर रौद्र आणि भयानक रसांच्या परिणामातूनच बीभत्स रस (पाहून शहारे येतील असे घाणेरडे चित्र) मूर्त होतो. नरसिंहाच्या रचनांत असा कोणता युद्धप्रसंग शक्य झालाच नाही. 'बीभत्स' रसाचे उदाहरण म्हणून स्वीकारायचे झाल्यास असे एकच पद मिळते. यांत रूपक आणि अतिशयोक्ति या दोन्ही अलंकारांचा स्पर्श झाल्यामुळे बिभत्सता थोड्या प्रमाणांत मागे पडते (झाकली जाते) या पदांत मृत्यू पावलेल्या माणसांचे अंतीम चित्रण देण्यांत आले आहे.

**बाला रे वदनी पालखी, जोतां वनितांने थाय उलास**
**नाहीधोईने पढियारे, तिलक कीधां भाल**
**वरना जानैऱ्यां शोभी रह्यां रे, माथे नारव्यां छे अबीर गुलाल**
**लीला ते वासंती पालखी रे, तेना उचकनारा चार**
**माथे ते बांध्या भीना पोतियांरे मोठे रामनाम पोकार**
**चोरी ते बोधी चोकमां रे, छाणो ते लाव्या जाय**
**गोलपपडी ते देखे कुतरां रे ते तो मनमां घणु मलकाय**
**बाळा रे आगळ चाले लाकडां रे पाछल चाले लाहाय**

**जमायी तो चाल्या सासरे, रे एने सासुने हरख न माय.**
**तोरणे तनखां डडियां रे, मांडवे लागी लार**
**उठ रे सासु तुं शंखणी रे, तोरो जमाई आव्या बहार,**
**पंधरसे पहेरामणी रे मसाणां नामनु गाम**
**लालबाईनी दिकरी रे, चित्ताकुवरी एनु नाम**
**जमायी तो रह्या सासरे रे, जानइयां आव्यां घेर**
**टको पैसो सर्वे खायी गयारे, विवाह कीधो छे रुडी पेर**
**बार घडा बार कोंडियां रे, उपर पैसो मेलो शेक**
**जई ने कहो एने बापने रे, हवे ताणीने मेलो पोरू**
**जीवने जमडा लेई गयां रे, देहीने कीधी ये हाल**
**नरसैयाऱ्यो स्वामी मल्यो रे, ते तो उतरिया भवपार**

(बालिकेच्या पतीची पालखी पाहून वनितेला (मृत्युदेवतेला) आनंद वाटला. स्वच्छ आंघोळ घालून त्याला झोपवला आणि कपाळावर टिळा लावला. वराकडची वऱ्हाडी माणसे सुंदर दिसत आहेत. त्यानी डोक्यावर अबीर गुलाल लावला आहे. हिरव्या बांबुची पालखी आहे आणि उचलणारे चौघे आहेत त्यांच्या डोक्याला रुमाल बांधलेले आहेत आणि ते मुखाने रामनाम उच्चारित आहेत चौघांत मंडप घातला आहे. जाळण्यासाठी गोवऱ्या आणल्या आहेत. गोलपापड्या पाहून कुत्र्यांच्या तोंडाला पाणी सुटलें आहे. नवऱ्यामुलापुढें लाकडें चालली आहेत, पाठीकडून निखारे चलले आहेत. जावयी सासरी चालला आहे, आणि याच्या सासूचा आनंद पोटात मावेनासा झाला आहे. मांडवाच्या तोरणाशीं ठिणग्या उडत आहेत. आणि मांडवात लांब रांग लागली आहे. (माणसांची) अग शंखीणी सासु उठ, तुझा जावयी बाहेर आला आहे. स्मशान नावाच्या गावांत १५ लोकांना पोशाख घालायचे आहेत. लालबाईची (अग्नीची) मुलगी आहे. तिचे नाव 'चिताकुवरी' आहे. अरे जावई राहिला सासरी, त्यांचे वऱ्हाड घरी परतले. पैसे टक्के, सर्वजण खाऊन गेले. विवाह उत्तम तऱ्हेने केला.

बारा घडे आणि बारा पणत्यांवर रोख पैसे ठेवले. त्यांच्या बापाला आतां सांगा, 'भरपूर रडून घे.' यमदूत जीवन घेऊन गेले आणि शरीराची ही स्थिती केली. नरसिंहाचे स्वामी भेटलें आणि ते भवपार झाले.

**शांत** - शांत 'रसाला स्वतंत्ररस' म्हणून स्वीकारायचे असेल, तर नरसिंहाची जी भक्ती ज्ञानाचीं पदे आहेत, त्यातील 'संसाराबद्दलची अनासक्ति' ची जी पदें आहेत. त्यांच्या समावेश शांत रसात होऊं शकेल.

**घडपण केणे मोकल्युं, जाण्युं जोबन रहे सौ काळ**

**उमरा तो डुंगरा थया रे, पादर थयां परदेस**
**गोळी तो गंगा थई रे, अंगे उजळा थया छे केश**
**न होतुं जोइतुं ने शीद आवियुं रे न होती जोई ती तारी वाट**
**घरमांथी हलवां थयां रे, एनी खुणे हळाओ ने खाट**
**नव नाडी जुजवी पडी ने आवी पोहो च्चो काळ,**
**बैरां छोकरां फट्फट् करे रे, नाना बालक दे छे गाळ**

(म्हातारपण कोणी पाठवले ? वाटत होतें सदा सर्वकाळ तारुण्य राहील - उंबरठा, डोंगरासारखा वाटायला लागला, आणि गावाची सरहद्द परदेशासारखी झाली. पाण्याचा माठ गंगेसारखा वाटायला लागला आणि अंगावरचे सारे केस पांढरे झाले. नको होते ते कशाकरतां आलें ? मी तुझी वाट पाहिली नव्हती. घरांत कांही मान राहिला नाही. याची खाट कोपऱ्यात हलवा (असा अपमान होऊ लागला) नऊ नाड्या विभक्त झाल्या आणि काळ येऊन पोचला बायका पोरे तिरस्कार करू लागली. छोटी मुलें (सुद्धा) शिव्या देऊं लागली) 'नरसिंहाची' भक्तीनो उपदेश आपनारां ज्ञांन नुं महत्व गानारां तसेच रझळती राडना रडवडतां छोकरां जुवानीने दहाडा रे हरिने जाण्या नहि- यमुनना घेला रे, आवरदा तो वही गई - वगैरे पदे शांत रसाची उदाहरणे म्हणतां येतील.

**अलंकार** - अर्थपूर्ण अलंकारांबद्दल बोलावयाचे झाल्यास, उपमा, उत्प्रेक्षा रुपक, अतिशयोक्ति ,प्रतिक, व्यतिरेक, अप्रस्तृतप्रशंसा असे अलंकार सहज सहज उपयोगांत आले आहेत. नरसिंहाच्या आत्मचरित्रपर काव्यांत स्वभावोक्ति सूचकपणे वर्णिली आहे. नरसिंहाचे हे वैशिष्ठ आहे. की शब्दालंकारामध्ये पण ते आंतरिक प्रास मिळवतात. ही एक सिध्दीच म्हणावी लागेल. जयदेवांच्या गीतगोविंद मधे आणि नामदेवांच्या अभंगात सहजपणाने वापरांत आलेला प्रकार नरसिंहानी तेवढ्याच स्वाभाविकपणे आत्मसात केलेला पाहायला मिळतो. प्रत्येक ओळीच्या अर्ध्या भागातला प्रास सर्व पदांत ओंवल्यासारखा ठेवला असलेली पदेंपण पहावयाला मिळतात. दोन्ही प्रकारची उदाहरणे या पूर्वीच दिली गेली आहेत. केसर भीना कहानजी, कुसुंमे भीनी नार, सुरत शोभागी शामला सहको यश गाय अशा पदांमधे वर्णाची साखरपुडाही झालेला दिसतो.

**गरबीओ- (स्त्रियांचीं फेर धरून गाणी)**

इ. स. १६६९ चे एक हस्तलिखित मिळाले आहे. या हस्तलिखितांत भाणदास नावाच्या गरबीकाराने (गरबी गीते लिहिणारा) रचलेल्या जवळ जवळ ८० रचना, त्याच्या भावाच्या हस्ताक्षरांत, सापडल्या आहेत. त्याने या वर्णनात्मक प्रकारच्या गेय रचनाना 'गरबुं' असें नाव दिले आहे, विशेष करून आश्विनांतल्या नवरात्र उत्सवांत देवी (माता) ला उद्देशून, या प्रकारच्या

गेय रचना, स्त्रीपुरुष, किंवा केवळ स्त्रीया अगर केवळ पुरुष, समुहरूपांत, नृत्य आविष्कारांत गोलाकार फिरतात, आणि, म्हणतात. भाणदासानंतर लौकरच उदयास आलेल्या अहमदाबादच्या वल्लभघोळांच्या आणि अन्य गायकांच्या अशा प्रकारच्या रचना, गुजराती साहित्यांत खूपच प्रसिध्द आहेत.

१९ साव्या शतकाच्या पूर्वार्धांत उदयास आलेल्या चाणोद- उभई च्या, सुप्रसिध्द भक्तकवी दयारामानी पण, वर्णनात्मक प्रकारांत मोडणा-या असंख्य गरबा रचना रचल्या आहेत. परंतु कांही आत्मलक्षी प्रकारांच्या मर्यादित ओळींच्या गरबी रचनांतच त्यांचे वैशिष्टय आहे. गरबी असो की गरबा समूहनृत्याचा हा गेय प्रकार आहे. सामान्यपणे मधोमध दिव्यांची मांडणी करून- म्हणजे गरबी मांडून- त्यांच्या भोवती गोल गोल फिरता फिरतां या रचना गायच्या असतात. कांही गरब्यांच्या प्रकारांत, कच्च्या मातीच्या छिद्रें असलेल्या घड्यांत, पेटल्या पणत्या ठेवून, ते घडे डोक्यावर घेऊन स्त्रीया, समुहनृत्यांत भाग घेतात. ज्या समूहनृत्यांत आत्मलक्षी पदें गायली जातात, त्याना 'गरबी' म्हणतात- आणि ज्यांत परलक्षी गीते गायली जातात त्यांना 'गरबा' म्हणतात. रासुसहरस्त्रपदी ना समुध्दार काव्यसंग्रहांत

दिलेल्या आणि न.मे.काव्यसंग्रहांत सापडलेल्या खालील रचना त्यांचा एक नमुना आहे.

**वहाला मारा, वृंदावयन रे चोक्य के विहिला पधारजो**
**गोकूल ग्रामतणी व्रजनारय के, वेगी बोलाकजो रे लोल- (१)**
**अम्हने रास रम्याना कोडके नाथ- संगि बेवडीरे बोल**
**लेवा मुखडाना मकरंद के, म्यस्त्री तेवतेवडी रे लोल- (२)**
**कडो वंसीवटने चोक के कुंज शोभा घणी रे लोल,**
**कंहुं जमुनाजीनुं तीर के तटि रलियामणी रे लोल (३)**
**यलिओ व्रजवनितानो साथ के, ताळी दिई हाय स्युं रे लोल (४)**
**फरतां गान करें व्रजनार के वचमां वालमो रे लोल,**
**कडी शरद्पुनमनी रात्य के सुंदर सोहामणी रे लोक (५)**
**जोवा मलिया चौद लोक के इंद्र तिहां आविया रे लोल**
**कडां पारिजातना पुष्पि के प्रभुनीं बधाविया रे लोल- (६)**
**ब्रम्हारुद्र परि एनुं ध्यान के पार पामे नहि रे लोल**
**ब्रम्हा रुद्र परि एनुं ध्यान के पार पामे नही रे लोल**
**नाथे नरसैयो सुख जोई के लीला नामनी रे लोल- (७)**

(माझ्या प्रिय कृष्णा, बृंदृवनांत अवश्य, आणि लौकर या. गोकुळ गावच्या गोपिंना ताबडतोब बोलावुन घे(१) कृष्णाबरोबर जोडीने रास क्रीडा करायची आम्हाला मोठी हौस

आहे. त्याच्या मुखांतील मध घेण्यासाठी आम्ही जशा होतो तशाच आलों (२) बांबुच्या वनातला चौक आणि कुजवनाची शोभा अपार आहे. यमुनेचा काठ, आणि तीर शोभायमान आहे (३) गोकुळच्या नारींची साथ मिळाली- हातानी काय टाळी देताहेत. (वाः वाः) मदन मानिनीची मिठी पडली. काय कोमल हात आहेत. (४)

गोल फिरत व्रजनारी गात आहेत, मध्ये प्रियकर (कृष्ण) आहे. शरद पौर्णिमेची सुंदर रात्र आहे. (५) ही रास पहायला चौदा भुवनें, आणि इंद्र तिथे एकत्र झाले. सुंदर अशा पारिजातकांच्या फुलांनी, कृष्णाचें त्यांनी स्वागत केले. (६) ब्रम्हा, रुद्र यांचे ध्यान करतात, पण त्यांना याचा पार लागत नाही- या लीलानाथाचें (कृष्ण भगवानाचें) दर्शन करून नरसिंह (आनंदाने) नाचूं लागतात (७)

आम्ही पूर्वी सांगितलें आहे कीं नरसिंह महेतांचे कितीतरी साहित्य अजुनही अप्रसिध्द आहे. त्या अप्रसिध्द रचनांतून, वरील, शुध्द गेय रचनेसारखी, समूहनृत्याला अनुरूप, अशी गरबी, सापडली आहे:-

**"शरद निशाए श्री महाराज के वनमां आविया रे, लोल-**
**मध निशाए वगाडी वेण के गोपिका चालियां रे- लोल १**
**श्रवणे सुणी मोरलीनो नाद के गोपी व्याकुल थयां रे- लोल**
**जे ज्यम हुंता पोताने धाम के, ते त्यम नीसर्यां रे - लोल**
**जुए नैणांभरी भरी नार के, गोपिका सुकोमली रे - लोल ३**
**वचन बोल्या श्रीमहाराज के कोहो केम आवियां रे- लोल**
**वलती बोली व्रजनी नार के तम आसरे आवियां रे- लोल - ४**
**रंगभर रास रमाडो नाथ के, शरद सोहामणी रे लोल,**
**उग्यो सोल कलानो चंद्र के अति रलियामणो रे- लोल ५**
**पूरण प्रीत जोई परिब्रम्ह क रुहिया भीडीया रे लोल**
**-------रे लोल- ६**

**वाजे ताल परवाज ने झांझ के वेणा वांसली रे, लोल**
**नाचे नरहरी नंदकुमार के गोपिका सहुं मली रे लोल- ७**
**चौकमां फरती व्रजनी नार के, वचे राधा- हरि रे लोल,**
**नव सत सजिया छे शणगार के पालव घुघरी रे लोल ८**
**हमची ले हरिजीनी साथ के ताली ले हाथमां रे लोल**
**नाचे नटवर मदनगोपाळ के युवतीनां साथमां रे लोल- ९**
**अंतरीख देवता रहीने जोय के पुष्पे वधावता रे लोल**

**रुपे रुडो नरसैयानो नाथ के मनमे भावना रे लोल- १०**

(या शरद रात्रीं श्री महाराज (कृष्णभगवान) वनांत आले. मध्यरात्री - मुरली वाजवली आणि गोपिका निघाल्या (१) कानानी मुरलीचा आवाज ऐकला आणि गोपिका व्याकुळ झाल्या, स्वतःच्या घरीं, त्या ज्या स्थितीत होत्या, त्याच स्थितीत, त्या बाहेर पडल्या (२) पूर्णानंद परब्रम्हाला पाहिलें आणि शुध्दबुध्द हरपून गेली, सुकोमल गोपिका डोळे भरभरून पहातच राहिल्या- (३) श्री महाराज (कृष्णभगवान) म्हणाले सांगा, कां आलांत? उलट बोलीने गोकुळच्या नारी म्हणाल्या "तुमचा आधार, म्हणून आलो" (४) शरदऋतू मोठा रमणीय, नाथ, आनंद पूर्ण क्रीडा करवा." १६ कलांनी परिपूर्ण चंद्र उगवला आहे. तो फारच सूंदर दिसत आहे.(५) गोपिकांची पूर्ण प्रीती पाहून परब्रम्ह श्रीकृष्णानी त्याना ह्दयाशीं धरले- (६) (मधली ओळ नाही)

टाळ, पखवाज, झांज, वेणु, मुरली- वाजत आहेत. नरहरी नंदकुमार, गोपिका सर्व मिळून नाचत आहेत- (७) चौकांत गोपिका फिरत आहेत (गोलाकार) आणि राधाकृष्ण मध्यें आहेत. घुंघरे- साडयांचे पदर एकंदरीत १६ शृंगार करून सारे सजले आहेत (८) हरीच्या बरोबर आम्ही टाळी देतो, आमची टाळी हातावर घे. नटवर मदनगोपाल, युवतीना बरोबर घेऊन नाचत आहे (९) अंतरीक्षांतून देवता पहात आहेत आणि फुलें उधळीत आहेत. रूपाने नरसिंहाचा स्वामी सुंदर आहे. मनांत प्रेमभावना आहेत)

या पूर्वीच्या गरबीत 'रास रम्याना कोड' ची गोष्ट आहे तर या गरबी गीतांत 'रास रमाडो' (क्रीडा करवा) च्या बरोबर 'हमची ले हरीजीनी साथ (हरीच्या बरोबर आमची साथ घे) अशी, रास आणि 'हमची' दोन्ही सूचना आहेत. स्त्रीपुरुष एकत्र जमून समूह नृत्य करतात, तेव्हां हमची (आमच्या) टाळीचा ताल घे, असें खूप सुचकतेने म्हटले आहे. एक तिसरी 'गरबी' पण मिळाली आहे. ती पण अजून अप्रसिध्द आहे.

**"रूडो आव्यो आसो मास के नवरंग शरद भली रे लोल**
**गरबे रमे श्री गोकुलनाथ के संग गोपी बनी रे लोल - १**
**पलवट वाली के पावडीए चडो रे लोल**
**प्रभुजीने कुंडल झलके कान के मुगट हीरे जडो रे लोल- २**
**वा'लो मारो वाहे मधुरो वांस के गोपी सहु सांभळे रे लोल**
**अबला नाहानी मोटी नार के सहु टोले मले रे लाल- ३**
**पेहेरा चरणां ने वली चरी के चाली फसमसे रें लोल**
**पेहारा मोतीना शणगाट के मेहेला- मन हसे रे लोल- ४**
**मस्तक लीधां महींना माट के चतुरु चालती रे लोल**

अमरीत वेणने चंचलनेत्र के प्रभुने निहालती रे लोल ५
आव्यां बंसीवटने चोक के रमवा नाथ शुं रे लोल
वा'ले मारे बलवंत भीडी बाथ के कोमल हाथ शुं रे लोल -६
कडी रामत रमे रंगीलो के राधा रस भरां रे लोल
ताहां तो थई रह्यो थेहिकार के वागे घुघरी रे लोल- ७

(रमणीय, आश्विन मास आला. नवरंगी शरद ऋतू मस्त वाटतो आहे. श्री गोकुलनाथ गरबा खेळत आहे, बरोबर गोपी आहेत- १) प्रभु (कृष्ण) ने पितांबराचा शेव बांधला आणि पायांत खडावा चढवल्या. कृष्णप्रभूच्या कानांत कुंडले झळकत आहेत, आणि मुगुटांत हिरे जडवलेले आहेत- (२) प्रिय कृष्ण मधुर मुरली वाजवत आहे आणि सर्व गोपी ऐकत आहेत, लहान, मोठ्या सर्व अबला नारी, मेळाव्यांत सामील झाल्या आहेत. (३) कोणी घागरा (परकर) नेसल्या, कोणी रेशमी चोळ्या घातल्या. मोत्यांचे दागिने घालून सजल्या. त्यांचे आनंद पूर्ण मन हसत होते. (४) हृदयाची हंडी डोक्यावर घेऊन, चतुर स्त्री चालु लागली. चंचल नेत्रांनी अमृत पूर्ण बांसरी आणि कृष्णप्रभुला पहात राहीली (५) बांबूंच्या बनांतल्या चौकांत, कृष्णनाथाबरोबर क्रीडा करण्यासाठी गोपी आल्या, माझा प्रिय बलशाली कृष्ण त्याना भेटला, कवेढे कोमल हात (६) सुंदर क्रीडेत रंगेल रसीक कृष्ण रमला आणि राधा रसमय झाली. तितक्यात तिथे थै थै आवाज, आणि घुंगरांचा झणकार दुमदुमला. (७)

या गरबीची सोडून दिलेली दोन कडवी वाहाला मारा वृंदवन रे चोक' या गरबी गीताच्या शेवटच्या दोन कडव्यांशी साम्य असणारी आहेत. अश्विन महिन्यांत श्री गोकुळ नाथ आणि गोपी गरबी खेळतात अर्थात् गरबा प्रकारातले समूहनृत्य करतात, हें या गरबी गीतांत, कवीला, सांगायचे आहे. पांचशे वर्षांपासून गुजरात, सौराष्ट्र भूमीवर 'गरबा' प्रकारचे समूहनृत्य अस्तित्वांत होते, या धारणेंला, दुजोरा मिळतो आहे आणि तो पण 'नरसिंहांच्या काव्यवाणींत'.

# ६ उपसंहार

आतांपर्यंत एक गोष्ट सहज स्पष्ट झाली आहे, की प्राकृत- अपभ्रंशांचे युग संपले होते आणि गुजरात सौराष्ट्राच्या भुमिवर लोकभाषानी आधुनिक स्वरूपाची विकासाची पावले टाकायला सुरवात केली होती. या काळाच्या प्रारंभीच नरसिंह महेतांचा जीवन काळ सुरू झाला होता. त्यांनी आपल्या जीवनाची रुपरेषा ठरवून, प्रभूचा भक्त म्हणून श्रीकृष्णांच्या लीला वर्णन करण्यावर आपली दृष्टी केंद्रित केली. यांच्या आत्मचरित्रपर काव्यांत, अनेक चमत्कारपूर्ण घटना यांनी वर्णिल्या आहेत. त्यावरून त्यांनी भक्त म्हणून परमत्त्व परमात्म्याच्या चरणी मस्तक ठेवून कशा रितीने जीवन निर्वाहाचा प्रयत्न केला होता हे पहायला मिळते. त्यांच्या काव्यांत चमत्कारपूर्ण घटनांमागे कोणती किल्ली होती, ते ही त्यांनी विशद केले आहे. त्यांचे ' दीव्य चक्षू' म्हणजे सामान्य भाषेत त्यांची कवी प्रतिभा चमत्कारपूर्ण घटनांचे वर्णन म्हणजे त्यांच्या कवीप्रतिभेचे सर्जनच. त्या काळांत भारतांतील ब-याच भागांवर मुस्लिमांचे आधिपत्य होते आणि भारतीय लोक एकप्रकारचे असहाय्य जीवन अनुभवीत होते. लोकांना धर्म आणि ईश्वराभक्ती ठेवण्यासाठी, वैष्णव भक्तीचे आचार्य संत, महंत, आणि भक्त मोठ्या प्रमाणांत प्रयत्नशील होते. या परंपरेचा अनुभव, आपल्याला नरसिंह महेतांच्या काव्यकृतींत येतो. यांच्या पुढें, भागवत पुराण, गीता, जयदेवांचे गीतगोविंद वगैरे वैष्णव धर्माशीं मिळते जुळते साहित्य तर होतेंच, त्याशिवाय नामदेव आणि कबिरांचे साहित्य होते. नरसिंहांच्या उत्कट कवीप्रतिभेने, त्यांतून प्रेरणा घेतली आणि गुजराती भाषेच्या चरणांशी तिच्या साहित्य इतिहासातील, विस्तृत पदसमूह, खेळत ठेवला.

त्यांच्या जीवनाच्या आरंभीच आपण पाहीले की त्यांच्याबद्दल ऐकून, लहान थोर हरिभक्त तळाजाला, त्यांच्याकडे येत असत. त्यांच्या भावा, भावजयीला ही गोष्ट आपत्तीच वाटे. परिणामी, नरसिहांनी गृहत्याग केला. नंतर भक्तिसाहित्याच्या परिचयामुळे भगवत गुणानुवाद, काव्यांत उतरवायचा त्यांना नाद लागला आणि तोच त्यांचा आधार ठरला. संत अभ्यागताना त्यांच्याकडून सन्मान मिळत असावा असे यात्रेकरूंच्या 'हुंडी' घटनेवरून वाटते. नरसिंहाच्या

घरी जी जी मंगल कार्ये झाली, तीं कोणत्या ना कोणत्या प्रकारें, उत्तम प्रकारे पार पडली. त्या मागे ईश्वर कृपा नियामक मानून नरसिंहानी गीतेतला अनन्य भगवत् शरणाचा सिध्दांत आचरणांत आणला. आजच्या २० व्या शतकांतल्या युगांत, या प्रकारची भगवत- शरण-भावना बुध्दिवादी लोकांच्या गळी उतरणे शक्य नाही. तरीपण संकट येते, आणि सर्व उपाय हरतात, म्हणून अत्यंत नैराश्य येते, तेव्हां अनन्य शरण भावना काय असेलं, त्याचा विचार येऊ शकतो.

**'वैष्णव जन तो तेने कहिये, जे पीड पाई जाणे रे'** - अशा राष्ट्रीय पातळीवरील भक्तिगीतांत वैष्णव भक्तांची जी व्याख्या दिली आहे ती, नरसिहांच्या स्वानुभवांचा 'परिपाक' आहे. असे जीवन मानव मात्रांना जरुरी आहे असा सारांश हे पद रुजु करीत आहे.

नरसिहांपासून सुरु झालेले भारताचे हे युग भक्ती चे होते. विशाल भक्तिसाहित्य निर्माण करून भारतांतील अनेक भागांत, ३०० वर्षांपर्यंत, भक्तीप्रवृत्तिद्वारे दीन दुःखीत लोकांना नरसिंह दिलासा देणारे ठरले. राष्ट्रीय जीवनाला उदात्त बनवण्यासाठी ज्या निरनिराळया तत्त्वांची जरुर असते. त्यामध्ये अनासक्तिपूर्वक भगवानाप्रित्यर्थ अनन्य शरणभावना हेंही आदरणीय तत्त्व आहे, असे नरसिंह महेतानी व्यतित केलेल्या जीवनावरून लक्षात येते. असा एक महान भक्त कवी गुजरात सौराष्ट्राच्या भुमीला विभुषित करून गेला, ही या भूमीची धन्यता आहे. याच भुमीने आपले जीवन म्हणजे मूर्तिमंत 'अनन्यशरणभावना' करुन टाकले. अनासक्त योगी, कर्मनिष्ठ, गांधीजीना जन्म दिला. नरसिंह महेता पण गांधीजींच्या जीवनांत एक आदर्श रूप होते.

# निवडक पदें

**वैष्णव जन तो तेने कहिये, जे पीड पराई जाणे रे,**
**परदुःखे उपकार करें, पण मन अभिमान न आणे रे- १**
**सकळ लोकमां सहुने वंदे, निंदा न करे केहेनीरे,**
**वाच काछ मन निर्मळ राखे, धन जननी तां तेहेनी रे, -२**
**समदृष्टी ने तृष्णा त्यागी, परस्त्री जेहेने माता रे**
**जिव्हाए असत्य नव बोले, परद्रव्य न झाले हात रे -३**
**माया मोह लोपे नहि तेहेने, चित वेराग मन मोहे रे**
**कृष्णनामनी ताळी राखे, अडसठ तीरथ तेहेने तन मोहरे -४**
**वणलोभी वळी कपट रहित कामक्रोध जेणे मार्यां रे**
**भणे नरसिंयो तेहनुं दरसण करतां कुल एकोत्तर तारयांरे- ५**

(दुस-यांची पीडा जो ओळखतो, त्याला वैष्णव म्हणावे. दुस-यांच्या दुःखांत जो उपकार करतो, पण, मनांत त्याचा (कधीही) अभिमान बाळगत नाही- सर्व ठिकाणी, जो सगळयाना वंदन करतो, निंदा कोणाचीही करीत नाही. वाचा, काया, मन जो शुध्द ठेवतो- त्याची जननी धन्य - जो समदृष्टी आहे आणि ज्याने आसक्तीचा त्याग केला आहे, परस्त्री ज्याला माते समान आहे - जो असत्य वाणी उच्चारत नाही, दुस-याच्या द्रव्याला जो शिवत नाही- माया मोहाचा ज्याला लेश नाही. ज्याच्या मनात वैराग्य आहे, कृष्णनामाशी जो एकरूप झाला आहे, अडसठ तीर्थे त्यांच्या मनांत आहेत. ज्याला लोभ नाही, शिवाय जो कपटरहित आहे, काम क्रोध ज्याने मारून टाकले आहेत, नरसिंह म्हणतात, अशा माणसाचे दर्शन केले तर एकाहत्तर कुळे तरून गेली समजावे.

**वास नही ज्यां वैष्णव केरो, त्यां नव वसिये वासडियां**
**श्वासोश्वास हरिस्मरण न करे जो, श्वास धमण केरो श्वासडियां -१**
**जीभ लडी जपमाळ न जपे तो, जीभलडी नहि खासडिया**

**जनम तेहेनो नहि लेखामां, जे न केहेवाय हरि- दासडियां- २**
**मोहनमीनी माया पाखे, अवट माया जम फांसडिया,**
**भणे नरसिंयो भारे मारी मावलडी दस मासडिया- ३**

(जिथे वैष्णव राहात नाही,तिथे मुरलीधर रहात नाही. श्वासोश्वासात जो हरी-स्मरण करीत नाही,तो श्वास म्हणजे लोहारा भाता- जिभेने जो जप करीत नाही,ती जीभ म्हणजे चामड्याची वहाण. जो स्वतःला हरीभक्त म्हणवत नाही,त्याचा जन्म दखल देण्यासारखा नाही. मोहनाची (कृष्णाची) माया सोडून दूसरी माया म्हणजे फासच. नरसिंह म्हणतात, १० महिने माझ्या आईला माझा (फुक्कट) भार झाला)

**बाई, मुने हरि जोवानी टेव पडी**
**मारा नाथने न मुकुं एक घडी**
**वेधलुं मन अलगुं न रहे, एवी हरजी शुं प्रीत जडी- १**
**आखा धाडानो रळी खळी आव्यो, भाभीए मुक्युं न पाणी**
**मे जाणुं ध्रु तणी पेरे करूं, भाभी नही गोराणी- २**
**नामानुं छापरुं छाही आपयुं कबीरानी अविचल वाणी**
**ते पाईता हुं हएश भलेरो छबिलोजी मुकशे पाणी ३**
**धन्य वृंदवन, धन्य ए भाभी, धन्य जमुनाजीनु पाणी**
**धन्य नरसैयानी जिभळडी, पछे छबीलाजीनी वाणी- ४**

(बाई,मला हरीला पहायची सवय झाली. एक क्षणही मी माझ्या नाथाला सोडणार नाही. माझें त्याच्याकडे वेधले गेलेले मन,दूर रहात नाही. हरीवर माझी अशी प्रीती जडली आहे. दिवस भराचा मी थकून भागून आलों,भावजयीने पाणी दिलें नाही. मी समजलों,धृवाप्रमाणे मी करावे. माझी वहिनी,वहिनी नाही,माझी गुरु आहे (२) नामदेवांचे छप्पर चाळून दिले. कबीराला अविचल (काव्य) वाणी दिली. ती मला मिळाली तर मी मोठा होईन - मला कृष्ण पाणी देईल. धन्य ते वृंदावन धन्य ती वहिनी,धन्य यमुनेचें पाणी- धन्य नरसिंहाची जीभ, जिच्यामागे कृष्णाची वाणी आहे.)

**संतो, अमे रे वेहपारिया श्री रामनामना**
**वेपारी आवे छे बधा गामगामना**
**अमारुं वसाणु, साधु सहुकोने भावे**
**अढारे वरण जेहेने वोहोरवाने आवे**
**अमारु वसाणु काल दुकाळे न खुटे**
**जेहेने राजा न दंडे जेहेने चोर न लुटे- २**

लाख दिनाना लेखां नहि, ने पार विनानी पुंजी,
वोहोरवुं होय तो वोहारी लेजो, कस्तुरी छे सूंधी- ३
राम नाम धन अमारे वाजे ने गाजे
छप्पर उपर बेर भेरी पुंगळ वाजे
आवरो ने खातावहीमां लक्ष्मीवरनुं नाम
चिठीमां चतुर्भुज लखियां, नरसेयानुं काम- ४

(संतजनहो,आम्ही रामनामाचे व्यापारी आहोत. गांव,गांवचे सर्व व्यापारी येत राहातात(१) आमचा माल साधू लोकांना आणि इतरानाही आवडतो. अठरा पगड जातीचे लोक हा माल भरभरून घ्यायला येतात. कोणत्याही काळांत दुष्काळांतही आमचा माल उणा पडत नाही. याला राजा दंड देत नाही की चोर लुटत नाही.(२) लाख शिवाय मालाचा हिशोब नाही. अपार अशी पुंजी आहे. घ्यायचा असेल तर माल भरभरून घ्या. ही स्वस्त कस्तुरी आहे(३) राम नामाच्या आमच्या धनाचा मोठा गाजावाजा आहे. भरभेरी,पिपाणी अशी छप्पनच्या वर वाद्यें वाजत राहतात. खातेवहीत लक्ष्मीवराचें ' नाव लिहा. चतुर्भज नाव नोंद वहीत लिहिन्याचे काम नरसिंहाचे आहे)

प्रेमरस पाने. तुं. मारेनां पिछधर
तत्वनुं टुं 'पण' तुच्छ लागे
दुबळा ढोरनुं कुशले मन चले, चतुरधा मुक्ती तेओन मागे.
प्रेमनी वात परीक्षित श्री छयो नही, शुकजीए समझी रस सताडया
ज्ञान वैराग्य करी ग्रंथ पुरो करयो, मुक्तीनो मार्ग सूधो देखाडर्या
मारीने मुक्ती आपी घणा दैत्याने, ज्ञानी विज्ञानी बहुमुनीरे जोगी
प्रेमने जोग तो व्रजतणी गोपिका, अवर विरला कोई भक्त भोगी
प्रीतने मुक्ती तो परम वल्लभ सदा, हेतुना जीव तो हेतु मुडे
जन्मोजनम लीलारस गावतां लहाणना बाहाण जेम द्वारछुटे- ४
मे ग्रहयो हाथ गोपिनाथ गरवा तळी, अवर बीजुं कोईये नहि भावे
नरसिया महामती गाय छे गुणकथी, जतीसतीने तो स्वप्ने आवे

(मोराचे पीस धरणा-या,(केसांत) मला प्रेमरस पाज- त्याच्यापुढें मला तत्वचर्चा तुच्छ वाटते. दुबळया ढोरांचे मन गवताकडेच ओढ घेणार- ती ढोरें चतुर्विधा मुक्ती नाही मागणार (१) प्रेमाची महती परीक्षितीने ओळखली. मुक्ती नाही,शुक मुनीना तें समजले आणि त्यानी प्रेमरस लपवला (सांगितला) नाही ज्ञान वैराग्य समजावून ग्रंथ पुरा केला आणि मुक्तीचा सरळ मार्ग दाखवला.(२) अनेक राक्षसाना ठार मारून (कृष्णाने) मुक्ती दिली. अनेक ज्ञानी,विज्ञानी,

मुनी आणि योगी, जनाना पण मुक्ती दिली. गोकुळच्या गोपींना प्रेमयोगाने मुक्ती मिळाली. क्वचित् कोणी भोगी भक्ताला मुक्ती दिली(३) प्रीतीची अत्यंत प्रीय म्हणजे मुक्ती (जिथे प्रेम तिथे मुक्ती हा ईश्वरी नियम) जीवांच्या हेतुंनुसार त्यांचे हेतु पुरे होतात. जन्मोजन्मी लीलारस गातांगातां, कोड कौतुकाच्या नावे प्रमाणे, जन्म मृत्यूचे दार सुटून जाऊन मुक्ती येते(४) अत्यंत श्रेष्ठ अशा गोपीनाथाचा हात मी धरला आहे, मला याहून दुसरे कांहींही आवडत नाही. नरसिंह मोठा बुध्दिवान, भगवंतांच्या गुण- कथा गातो. अशा गुण- कथा की ज्या एकाद्या जातीच्या (साधू) अगर सतीच्या स्वप्नांतही येणार नाहीत

(मधुर भक्तीचीं पदें)

ध्यान धर हरितणुं, अल्पमती आळसु
जे थकी जन्मनां दुः ख जाये
अवर धंदो करिय कैं नव सरे
माया देखडिने मृत्यु वहायेत्र १
सकल कल्याण श्रीकृष्णनां चरणमां
शरण आवे सुख पार होये
अवर वेपार तुं मेहत्य मिथ्या करी
कृष्णनुं नाम तुं राख मों अे- २
पटक माया परी, अटक चरणे- हरि
वटकथमां वात सुणतांज साची
आशनुं भवन आकाश सुधी रच्चुं
मूढ, ए मूळथी भींत काची- ३
अंग जोबन गयुं, पलित पिंजर थयुं
तोय नथी लेतो 'श्रीकृष्ण' केहेवु
चेत रे चेत, दिन चार छे लाभना
लींबु लेहकावतो राज लेवुं- ४
सरस गुण हरितणा जे जन अनुसरया
ते तणा सुजश तो जगत बोले
नरसिंया रंकने प्रीत प्रभु- शुं घणी
अवर वेपार नहि भजन- तोले- ५

(हे मंदबुध्दी आळशी माणसा, हरीचें ध्यान धर. तुझ्या जन्मभराचें दुः ख ज्यामुळे नाहीसे होईल. दुसरा धंदा करून कांही अर्थ निघणार नाही. संसार मायेत फसून गरज ओढवेल - (१)

कृष्णाच्या चरणांशी सारे कल्याण आहे. जो श्रीकृष्णाचा आश्रय घेतो तो सुखाच्याही पार जातो. असत्य मानून तूं दुसरें धंदे सोडून दे. कृष्णाचे नामस्मरण तुझ्या मुखांत राहूंदे (२) माया परी, निग्रहाने सोड आणि श्रीकृष्ण- चरणांशी बध्द रहा. कथेमध्ये कथाकार सांगतात ती गोष्ट अगदी सत्य आहे. आशेचा महाल आकाशापर्यंत बांधलास, पण हे मूर्खा, पायांपासून त्याची भींत कधी आहे. अंगांतले तारुण्य संपले, शरीर एक अस्थिपंजर झालें तरीपण श्रीकृष्णाचे नाम हा घेत नाही. जागा हो अरे बाबा, जागा हो, लाभ करून घ्यायचे दिवस चार (फार कमी) राहिले. लींबु उडवून झेलायचे आणि राज्य घ्यायचे (तितकाच वेळ आहे) हरीच्या उत्कृष्ट गुणांचे ज्यांनी अनुकरण केले, त्यांची कीर्ति, जगाने गायली या दरिद्री नरसिंहाला कृष्णाची इतकी प्रीति, वाटते, कीं दुसरा कोणताही उद्योग भजनाच्या तुलनेत, येत नाही.)

जे गमे जगत- गुरुदेव जगदीशने
ते तणो खरखरो फोक करवो.
आपणो चिंतव्यो अर्थ काई नव सरे
उगरे एक उद्वेग धरयो
हु करूं हुं करूं एज अज्ञानता
शकटनो भार ज्यम श्वान ताणे
सृष्टी गंडाण छे सर्व एणी परे
जोगी जोगेश्वरा कोक जाणे- २

नीमजे नरथी तो कोई रेहे ना दुखी
शत्रु मारीने सहु मित्र राखे
राय ने रंक कोई दृष्टे आवे नही
भवन पर भवन पर छत्र दाखे- ३
ऋतु लता पत्र फल फूल आपे यथा
मानवी मूर्ख मन व्यर्थ शोचे
जेहना भाग्य मां जे समे जे लख्युं
तेहने ते समे ते ज पहुंचे- ४
सुख संसारी गिश्या करी मानजो
कृष्ण बिना बीजुं सर्व काचुं
जुगल कर जोडी करी, नरसिंयो एम केहे
जन्म प्रतिजन्म हरि ने ज जावुं- ५

(विश्वाच्या गुरुस्थानी असणा-या जगदीशाला जे आवडते, त्याचे दुः ख तूं करूं नको.

आपण विचार करून कांहींच अर्थ निष्पन्न होत नाही,उगीच उद्वेग मात्र निर्माण होतो. मी कर्ता मी धर्ता हेंच अज्ञान. गाडीचा भार तोच उठवतो आहे,असें कुत्र्याला वाटावे तसें सृष्टीचें सर्व कार्य त्याच्या (ईश्वराच्या) भरवशावर चालत आहे. योगी,योगेश्वराला एकादाच ओळखतो. माणसाने निर्मिती केली असती,तर कोणी दु:खी राहिला नसता. शत्रूला मारून सर्वानी मित्र शिल्लक ठेवले असते. श्रीमंत आणि गरीब यांत फरक राहिला नसता,आणि घराघरावर छप्पर राहिले असते(३) ऋतूनुसार लता,पाने,फळें आणि फुलें देते. मानवाचें मूर्ख मन उगीच विचार करत रहाते. ज्याच्या भाग्यांत जें,ज्या वेळी,मिळायचे असते,त्याला तें त्या वेळींच मिळते.(४) संसारातले सुख खरे नाही हे समजून राहा. एका कृष्णाशिवाय बाकी सर्व अपुरें आहे. दोन्ही हात जोडून नरसिंह म्हणतात,जन्मोजन्मी मी हरीलाच भजत जाईन.)

**शरीर शोध्या विना सार नहि सापडे**
**पंडिता पार नहि पामो पाये**
**तांदुला मेहेलीने तूषने वळगी रहयो**
**भुख नहि भागे एम ठाले थोथे- १**
**रसना स्वादमां सर्व रुंधाई रहया**
**विगति गुरु- ज्ञान विना रे गुंथे**
**वाणी- विलासमां विविध वाणी वडे**
**परहरी वस्त्रने वळगे चुंथे शरीर- २**
**शास्त्र कथा कहे रजनिमां आथडे**
**एम अज्ञानमां शीश गोठे**
**प्रपंच पिंडमां रहयो अहंकार नव गयो**
**आथडयो एम अनंत कोठे- ३**
**शब्द शीखे खरो, सकल विद्या भण्ये,**
**अध्यात्म उचरे आवी आये**
**भणे नरसियो, जे भेद जाणी जुओ**
**में तो रची कहयुं पद चोथे- ४**

(शरीर शुध्द केल्याशिवाय तत्त्व सापडणार नाही. पंडिताला त्याचा पार कधी लागला नाही. तांदूळ सोडून कोंडयाला चिकटून बसले. तोंडात चोथा कोंबून भुख भागत नाही (१) जिभेच्या चोचल्यांत सर्व राहून गेले. गुरु ज्ञाना अभावी दुर्गती होत जाते. विविध शब्दांनी वाणी विलास करते आणि नेसलेल्या वस्त्राला चिकटून बसून शरीर त्रासवते शास्त्र सांगते,कथा सांगते पण काळोखांत (अज्ञानात) धडपडते. अज्ञानांत बुध्दी खर्च करते. मुळापासून संसारी, त्याचा

अहंकार गेला नाही. असाच अगणित गोष्टींत अडकला. शब्दज्ञान घेतलं खरं, सगळ्या विद्या संपादन केल्या. त्यांतून अध्यात्म वरवर येत गेले. नरसिंह म्हणतात हे भेद ओळखून पहा (शब्द पंडीत आणि आत्मज्ञानी मधला) मी तर चौथे पद रचून, हें सांगितले.)

**ज्यां- लगी आतमा तत्व चीन्यो नही, त्यां- लगी साधना सर्व जुठी**
**मानुष देह माहरो एम एणे गयो, मावडांनी जेम वृष्टी वुठी- १**
**शुं थयुं स्नान सेवा ने पूजा थकी ? शुं थयुं घेर रही दान दीधे ?**
**शुं थयुं धरी जटा भस्मलेप करये ? शुं थयु वाळ- लोचंन कीधे ?**
**शुं- थयुं तप ने तीरथ कीधा थकी ? शुं थयुं माळ ग्रही नाम लीधे ?**
**शुं थयुं तिलक ने तुलसी धार्यां थकी ? शुं थयुं गंगजळ पान लीधे ?**
**शुं थयुं वेदव्याकरण वाणी वधे ? शु थयुं राग ने रंग जाण्ये ?**
**शुं थयुं खट दर्शन - सेवा थकी ? शुं- थयुं वरणना भेद आण्ये ?-४**
**ए जे परपंच सहु पेट भरवा तणा, आतमाराम परब्रम्ह न जोयो**
**जाणे नरसिंया ज्ञे तत्त्वदर्शन विना, रत्न चिंतामणी जन्म खोयो- ५**

(जोपर्यंत आत्मतत्त्व ओळखलें नाही, तोंपर्यंत सर्व साधना झूट आहे. तुझा मानव देह असाच वाया गेला- जशी पाण्याशिवाय ढगांची वृष्टी, फुकट असते (पाऊस येईल असें वाटण्या सारखे वातावरण होते पण पाऊस पडत नाही, त्याला मावडोनी वृष्टी म्हणतात) स्नान, सेवा आणि पूजा करून काय झाले ? (कोणता आध्यात्मिक फायदा झाला ?) घरांत राहून दान दिले, पण काय झालं ? जय वाढवून, भस्म चोळून, काय झाले ? मुंडण करून काय झाले ? (२) तप करून तीर्थयात्रा करून काय झाले ? माळ घेऊन्न नामजप केला- काय झाले ? टिळा लावून तुळशीची माळ गळयांत घालून काय झाले ? गंगाजळ सेवन केले, काय पडले पदरांत ? (३) वेद सांगून, व्याकरण सांगून, मोठेमोठे शब्दज्ञान सांगून काय झाले ? राग, तसे रंग ओळखून काय झाले ? धार्मिक नित्यकर्म केले दर्शन केले, सेवा केली, पण काय झाले ? वर्णभेद स्पष्ट केले (पण) काय झाले ? - (४) हे सारे उद्योग केवळ पोट भरण्यासाठी- आत्माराम परब्रम्ह यानीं कधी अभ्यासला (पाहिला) नाही. नरसिंह म्हणतात तत्त्वदर्शनाशिवाय, चिंतामणी रत्नासारखा, मानव जन्म फुकट गेला)

**एक तुं एक तुं एम सहुको स्तवे**
**कोण हुं ए नही को विचारे**
**कोण छुं क्यां थकी आवियो जग विषे**
**जेश क्यां छुटशे देह त्यारे ?- १**
**प्रतिदिन जड कने जै करी मागतो**

ईश तु साहय थाजे सदारे
लोहय पण दुः ख तो लेश टळतुं नथी
थाकतो तो नथी तुं कदा रे- २
कोई तो उदधी गगनमां ताकता
भाखता जोवुं हुं नम्र वाणी
कोण हुं कोहोनी कने मागुं शा हक थकी,
ए नथी जाणता मूर्ख प्राणी- ३
एग करतां कदी लाभ जो पामियो
तो कहे, हरी तणी साहय थै रे
काम कथण्या थकी भविषने भांडतो,
पूर्वना कर्म जो हरि भजे नव टले
तो कहो, कोण ए काम करशे ?
सत्य समझी कदी परमपद परखशे
भव- भय- भ्रमने ते ज हरशे- ५
आकना वृक्षथी अमृत फल तोडवां
मूर्खो जो कदी आश धरशे
श्रमवृथा तेहनो तो जई जगविशे
ज्ञान हीणो सदा ते ज ठरशे- ६
जीव ईश्वर अने ब्रम्हना भेदमां
सत्यवस्तु नही सद्य जडशे
हुं अने तुं पणु तजीश, नरसियां तुं
गुरुतणी हर्षथी पार पडशे- ७

( तूं एक तूं एक अशी सर्व प्रार्थना करतात. मी कोण हा विचार कोणी करीत नाही. कोण आहे मी, कुठून आलों, या जागांत. शरीर सुटेल तेव्हां मी कुठे जाईन(हा विचार कोणी करीत नाही) - १ रोज जयजयकार करून, ' प्रभू मला सतत साह्य कर' असें मागणे तूं 'जडा' शी मागतोस. दुः ख लेशमात्रही टळत नाही. तरीही तूं कधींच थकत नाही रे - (२) कोणी मान वर करून आकाशांत पहातो आणि नम्र वाणीने प्रार्थना करताना मी पहातो. मी कोण, कोणाशी, कोणत्या हक्काने, मागत राहूं हें मूर्ख प्राणी जाणीत नाही- (३) असं करतां करतां कधी फायदा झाला तर म्हणतो हरीने साह्य केले. काम बिघडले तर पूर्व कर्माला दोष लावून, भविष्याशी भांडतो - (४) हरीचें भजन करून पूर्वकर्म टळले नही, तर सांगा हें काम (हरीभक्ती करणे) कोण

करील ? सत्य लक्षांत घेऊन,केव्हांतरी परमपद जर ओळखील,तरच त्यांचे संसार भय आणि त्यांचा संसाराचा भ्रम नाहीसा होईल- (५) रुईच्या झाडावरून अमृत फळें तोडायची आशा, जर मूर्ख कधी करील,तर या जगांत त्याचे श्रम फुकट जातील. आणि तो सतत अज्ञानीच राहील. (६) जीव,ईश्वर आणि ब्रम्ह यांच्या भेदभावांत,सत्यवस्तु सापडणार नाही. नरसिंहा, मी- तूं- पण जर सोडशील,तर तूं गुरु उपदेशाने आनंद पूर्वक,संसार पार होशील)

**हुं खरे तु खरो हु विना तुं नही,**
**हुं रे हैश तांहालगी तु रे हैशे**
**हुं जते, तुं गयो, अनिर्वचनी रह्यो**
**हुं विना कहे तुं ने कोण कहेशे -१**
**सगुण होय जहांलगी, निर्गुण तांहालगी,**
**एम कहे सदगुरु वात साची**
**सगुण शमतां निर्गुण गयुं छे शमी**
**शेष छे पूर्ण तांहां अनिर्वाची- २**
**जीव ने शीव तो नायक छे एक जो**
**जीवन होये तांहां लगे शीव होये**
**जीव शमतां शीव सेहेजे समाई गयो**
**टळी जाये द्वंद्व - हे नाम दोये- ३**
**ताहारा माहरा नामनो नाश छे**
**लूण ने नीर दृष्टांत जोते**
**महेतो नरसैं केहे, वस्तु विचारतां**
**वस्तुरूप थारो वस्तु पोते- ४**

(मी सत्य तर तू सत्य,माझ्या अस्तित्वाशिवाय तुला अस्तित्व नाही. जोंवर मी आहें,तोवर तूं असशील. मी गेल्यास तू गेल्यासारखाच आहेस- राहलास शेवटी अनिर्वचनीय. सांग, माझ्याशिवाय,तुला कोण हाक मारणार ? (१) जोपर्यंत सगुण आहे,तोपर्यंत निर्गुण आहे. हें सदगुरु सांगतात ते अगदी सत्य आहे. सगुण नाहीसें झाले की निर्गुण संपते- शेवटी रहातें ते पूर्ण अनिर्वाची.(२) शीव आणि जीव पहा,एकच तत्त्व आहे. जीव आहे तिथे त्याला संलग्न शीव आहे. जीव शमतो तिथे आपोआपच शीव शमतो.द्वंद्व संपते आणि दोन्ही नावेंही संपतात. (३) तुझें,माझें हा निर्देश नष्ट होतो. मीठ आणि पाणी यांचा दृष्टांत लक्षांत घ्या. नरसिंह म्हणतात वस्तूचा विचार करतां करतां,वस्तू स्वतः वस्तूरूप होऊन जोते.(४)

**निरख- ने गगनमां, कोण घुमी रहयो ?**

**'ते ज हुं', 'ते ज हुं' शब्द बोले**
**शामनां चरणमां इच्छु छुं मरण रे**
**अहिंया कोई नथी कृष्ण तोले- १**
**श्याम - शोभा घणी, बुध्दी ना शके कळी**
**अनंत ओच्छवमां पंथ भूली**
**जड अते चैतन रस करी जाणवो**
**पकडी प्रेमे सजीवंत मूळी - २**
**जळहळ ज्योत उद्योत रवि कोटिमां**
**हेमनी कोर ज्यां निसरे तोलो**
**सच्चितानंद आनंद क्रीडा करें**
**सोनानां पारणा मांहय झुले- ३**
**बत्ती विण, तेल विण, सूत्र विण जो वळी**
**अचळ झळके सदा अनंत दीवो**
**नेत्र विण निरखवो, रूप विण परखवो**
**वण जिह्वाए रस सरस पीवो- ४**
**अकल अविनाशी ए नव ज जाए कल्ये**
**अरध- उरघनी मांहय माहाले**
**नरसिंयारो स्वामी, सकळ व्यापी रहयो**
**प्रेमनां तंतमां संत झाले- ५**

(पहा ना, आकाशांत (हदयांत) कोण फिरत आहे ? मीच तो मीच तो असें म्हणत आ. . कृष्णाच्या चरणांशी मरावे अशी माझी इच्छा आहे. कृष्णाच्या तुलनेत इथे कोणी नाही (१) बुध्दीला आकलन होणार नाही, अशी कृष्णाची शोभा (महती) आहे. अगणित समारंभांत (ईश्वरानिमित्त) मार्ग विसरली आहे (बुध्दी) जड आणि चैतन्य यांचा एकरस करून (कृष्णाची महती) जाणावी. प्रेमाने, ही संजीवन मुळी __ (कृष्ण) पकड- (३) कोटी सूर्याचे तेज तिथे झगमगत आहे. (परब्रम्हांत) जिथे ज्योत झाली आहे, परब्रम्ह कृष्णरूपाने अवतरल्यावर सोन्याची कांती बाहेर आली आहे. बरोबरी करायला सोन्याच्या पाळण्यांत झोके घेण्याची आनंदपूर्ण क्रीडा, सच्चितानंद करीत आहे. बत्तीशिवाय, तेलाशिवाय, वाती शिवाय पहा तर खरं, अविरत, अचल, अग्नीचा दिवा कसा झगमगतो आहे डोळयांशिवाय पहावा, रूपाशिवाय ओळखावा आणि याचा रसास्वाद जिभेशिवाय घ्यावा(४) हा अचल, अविनाशी कळला जाणार नाही. हा वर (इकडे) खाली (तिकडे) आणि त्यांच्या मध्ये, मजा करीत आहे. नरसिंहाचा

स्वामी सर्व व्यापी आहे. संत,याला प्रेमरज्जुनी बध्द करतात(५)

**अखिल ब्रम्हांडमा एक तूं श्रीहरी, जुजवे रूपे अनंत भासे**
**देहमां देव तुं, तेज मां तत्व तुं, शुन्यमा शब्द थई वेद वासे- १.**
**पवन तुं पाणी तुं भुमि तुं भूधरा, वृक्ष थई फुली रहयो छे आकाशे**
**विविध रचना करी अनेक रस लवाने, शीव थकी जीव थयो एज आशे २**
**वेद तो एम कहे, श्रुतिस्मृती साख दे, कनक कुंडल विषे, भेद नोहिये**
**घाट घडिया पछी नामरूप जुजवां, अंत्ये तो हेमनु हेम होये- ३**
**ग्रंथ गडबड करी वात न करी खरी, जेहेने जे गमे तेहेने पूजे**
**मन कर्म वचनथी आप मानी लेहे, सत्य छे एज मत एम सुजे- ४**
**वृक्षमां बीज तुं, बीजमां वृक्ष तुं, जोऊ पटंतरो एज पासे**
**भणे नरसियो ए मन तणी शोधना प्रीत करू प्रमथी प्रगट थाशे- ५**

(संपूर्ण ब्रम्हाडांत वेगवेगळया रूपानी अनंत भासणारा श्रीहरी,तूं एक आहेस. देहांत तूं देव आहेस. तेजांतले तूं(प्रकाश) तत्त्व आहेस. आकाशांत शब्द होऊन वेद बोलतोस (तूं) (१) वायू तूं,पणी तु हे भुधरा,भुमि तूं आहेस. वृक्ष होऊन तूं आकाशांत फुलला आहेस. अनेक रसास्वाद घेण्यासाठी तूं विविध रचना केल्यास. याच आशेने तूं शिवांचा जीव झालास(२) सोने आणि सोन्याचे कुंडल यांत (तत्त्व) भेद नाही असे वेद म्हणतात आणि श्रुतिस्मृति त्याला साथ देतात. घाट घडवल्यानंतर (त्या सोन्याची) नामे,रूपे,वेगवेगळी झाली. शेवटी सोने तें सोनेच रहाणार (३) ग्रंथांत घोटाळे असतात, सत्य समजत नाही. ज्याला जें आवडते ते त्याला पुजनीय वाटते. मन,कर्म आणि (ग्रंथ) वचननुसार स्वतःला जें वाटतें तेच सत्य आहे असें त्याचे मत होते(४) तूं वृक्षांतले बीज आहेस,आणि बीजांतला वृक्ष तूंच आहेस. तुझ्यातच सामावलेले हे विभक्तपण मी पाहतो.नरसिंह म्हणतात,मनांत शोध कर. मी कृष्णावर प्रेम करतो. प्रेमानेच तो प्रगट होईल- ५)

**जागीने जोऊं तो जगत दीसे नही**
**ऊंघमां अटपटा भोग भासे**
**चित्त चैतन्य विलास तद्रुप छे**
**ब्रम्ह लटकां करे ब्रम्ह पासे- १**
**पंच महाभूत परब्रम्ह विशे उपनां,**
**अणुं अणुं मोहे रहया रे वळगी**
**फुलनां फळ ते तो वृक्षना जाणवा**
**थड थकी डाळ ते नहि रे अळगी २**

जीव ने शिव ती आप इच्छाए ध्या
रची परपंच चौद लोक कीया
भणे नरसिंयो, ए तेज तुं तेज तु
एहेने समरवाथी कै संत सीध्यां- ३

(जागृत अवस्थेत (ज्ञानी अवस्थेत) जग दिसत नाही. झोपेतच (अज्ञानी अवस्थेत) अटपटे (गुंतागुंतीचे) भोग भासतात. मनांतल्या चैतन्याचे मनाशी तद्रुप होऊन केलेले विलास आहेत. ब्रम्हाचे, ब्रम्हापाशीं हे (सारे) चाळे चालले आहेत. परब्रम्हातुन पंचभुते वर आली आहेत, आणि अणुरेणुत, त्याना बिलगुन राहीली आहेत. वृक्षांची ओळक्ष पटण्यासाठी फुल आणि फळ असते. धडापासून फांदी वेगळी होत नाही. जीव आणि शीव स्वेच्छेंने (जीवशीव) झाले, आणि त्यांनी १४ भुवनांचा संसार थाटला. नरसिंह म्हणतात, हें सारे ते तूंच आहेस तोच तूं आहेस. याचे (निरंतर) स्मरण करून कित्येक संत तरून गेले.)

मोहिनी - स्वरूप

आ जोने कोई उभी रे, आळस मोडे
बांहे बाजुबंद बोरखां -होची, मनडुं मोहयुं छे एने मोढे
झांझर झमके ने वींछुआ ठमके हींडे छें वांके अंबोडे
सोव्रण झारी ते - अति - रे समारी, मांहे नीर गंगोदक होडे,
नरसिंयाने पाणी पावाने, हरिजी पधात्या कोडे- २
मोहया मोहया मुनिवरराया रे, गोरी तारे गाजुडे
रूप- स्वरुप कल्युं न जाये, में तो जाणी छे ईश्वरी माया- १
रुमझुम रुमझुम नेपूर वाजे, पावले अनि चीर ति चोपे रे
घुंघटमां मुख एणी पेर शोभे, मोटां मुनिजनना मन कांपे रे- २
गोरूं- शुं वदन ने गळस्थळ झळके उपर दांमणी लळके रे
साकुदाणी - कोर एणी पेर शोभे, जाणे गगनमां वीज चलके
वशीकरण वेणी तम्यो किहां गुंथावी, सुंदरी शणगटवाडी रे ?
आ चोळी तम्यो किहा सिवडावी जेने मोही व्रजनारी रे ?- ४
चंचल दृष्टे चौ- दश निहाळे, मोहे मदननो चाळो रे
नरसिंया-यो स्वामी जोवा सरीखडो कोई ए सुंदरी नु वदन- ५

(ही पहा ना, आळोखे पिळोखे देत कुणी उभी आहे. हिच्या दंडावर बाजुबंद आहेत, हातात कांकणे आणि पोची आहे. हिच्या मुखाकडे पाहून माझें मन अगदी मोहित झाले आहे. हिचे पैंजण झुणझुणत आहेत आणि जोडवी छुमछुम करीत आहेत. सैलसा आंबाडा घालून ही चालत

आहे. हिने सुवर्ण झारी खूप सजवली आहे. त्यांत गंगोदक झाकले आहे. नरसिंहाला पाणी देण्यासाठी मोठया लाडानी कृष्ण आले आहेत - (२) हे सुदरी, तुझ्या सौंदर्याच्या प्रिसिध्दिने मोठेमोठे मुनी अत्यंत मोहित झाले. तुझ्या सौदर्याने वर्णन शब्दांत सांगतां येत नाही. मला तर वाटते, (तू) इश्वरी माया आहेस (१) तुझ्या पायांतली नुपूरे रुणझुण रुणझुण वाजताहेत. तुझ्या पावलांखाली तुझे वस्त्र दबत आहे. हिचा घुंघटांतला चेहरा, स्वसौंदर्यानेच शोभतो आहे, आणि मोठयामोठया मुनीजनांचे मन विचलित होत आहे.(२) हिच्या पावलांवर साडीचा काठ, चमकतो आहे.(३) शृंगार करणा-या हे सुंदरी, वशीकरण करणारी ही वेणी तूं घातलीस तरी कुठे ? व्रजनारीला मोह पाडील अशी ही चोळी तू कुठे शिवून घेतलीस ?(४) ही चंचल दृष्टीने, चारी दिशांकडे पहात आहे- मदनाचा चाळाच आहे हा. नरसिंहाच्या स्वामीसारखा, हिचा सुंदर चेहरा कोणीतरी पहा ना- ५)

**आ शो चतुरांना चितनो चाळो रे, एने कोई निहाळो रे- १**
**ब्रम्हाए तो नथी घडी भामिनी, ए तो आपे बनीने आवी रे- २**
**त्रणे लोकनुं तेज तारुणी, ए तो छबी, छबीले बनावी रे- १**
**घडयुं घरेणु एने रे हाथे, हाथे भरी छे चोळी रे,**
**साळुडे भात नव नारीकुंजरनी , कसूंबाना रंग मां बोली रे - २**
**श्वास पुरयो एने वृंदावनमां, गोवर्धन थकी आवे रे**
**ए नारीनी जात जे को जाणे, तेनो फेरो फावे रे- ३**
**कहिये छिये पण कहयुं नव माने, ए तो नारी नही गिरीधारी रे**
**ब्रम्हा इंद्र शेष शारदा, एना चरणतण अधिकारी रे,**
**अंतर हेत पोतानु जाणी, ए तो आपे छे, अंतरजानी रे,**
**व्यभिचार मुकी जुवो विचारी, ए तो नरसिंया-यो स्वामी रे**

(कुणी पहा तर खरा, काय हा चतुर मनाचा चाळा. ही सुंदर स्त्री ब्रम्हदेवाने घडवली नाही. ही स्वतः स्वतः ला निर्माण करून आली आहे. या तरुणीत तिन्हीं लोकांचे तेज आहे. ती तर त्या छेलछबिल्याने (कृष्णाने) बनवली आहे(१) आपल्या हाताने कृष्णाने हिचे दागिने घडवले, आपल्या हाताने हिच्या चोळीवर भरतकाम कले, या गज (गामिनी) स्त्रीची नव्या प्रकारची साडी कुंसुबी रंगात बुडवून रंगवली आहे(२) वृंदृवनाला याने जीवन दिले. गोवर्धनच्या तिथून येतो आहे. या स्त्रीची जात (ओळख) जर कुणी जाणली, तर त्याचा हा जन्मफेरा सफल झाला.(३) सांगितले पण सांगितलेले ऐकत नाहीत, ही स्त्री नाही, हा गिरीधारी ब्रम्हदेव, इंद्र, शेषनाग, शारदा, याच्या चरणांशी बसायच्या योग्यतेच्या आहेत. (४) हा अंतर्यामी, माझ्या मनांतला हेतू ओळखून, मला देत आहे. अनेक विचारांशी तद्रूप होण्यापेक्षां,

मनन करून पहा, हा नरसिंहाचा स्वामी (कृष्ण) आहे.- ५

**वसंत भलो भले उदयो रे, वरत्यो जेजेकार**
**अबिल गुलाल उठाडे अति अबला सुंदरी खेले फाग- १**
**पाडल- परिमल, आंबा- मोर ने गुलाल कशेर- घोल**
**सही रे समाणी रंगभर रमतां तारुणी मुख तंबोल- २**
**अढार भार वनस्पती मोरी, केसू लेहेरे जाये**
**नरसिंहाच्या स्वामी संग रमतां उलट अंग न माये- ३**

(मजे मजेने वसंत ऋतूचे आगमन झाले आहे. चला जयजयकार करूं या. गोपी अबीर गुलाल उधळत आहेत. सूंदरी होळी खेळताहेत(१) पाडलाचा वास, आंब्याचा मोहोर, गुलाल केशर एकत्र घोळून, रंगभरीत क्रीडा होत आहे. त्यांत सखी सामावून गेली आहे. तिच्या चेहरा लाल झाला आहे.(२) अठरा भार वनस्पती मोहोरल्या आहेत आणि केशरी फुले तरंगत आहेत. नरसिंहाच्या स्वामीबरोबर क्रीडा करताना अंगात उत्साह मावत नाही (३)

शरद पूनव तणा दिवस आव्या तिहां,
रास मरंजादनो वेण वाहयो
रुकमणी आदि देई सर्व टोळे मळी
नरसिंये तिंहो करव्या साहयो- १
पुरुष पुरुषातन लीन थयुं माहरूं
सखी रूपे थयों मध्य गावा
देहदशा टळी माहे रहयो भळी
दूती थै मानिनीने मनावा- २

**हाव ने भाव रसभेदनां प्राछव्या**
**अनुभवतां रस बस रे थातां**
**प्रेमे पितांबर आपियुं श्रीहरि**
**रिझिया कृष्णजी ताळ वातां- ३**
**व्रज तणी आद्य लीलानुं दरशण हवुं**
**अरुण- उदे रे शंखनाद कीधो**
**रुक्मणी आदि सहु नारी त्रपत थई**
**रामाए कंठथी हार दीधो- ४**
**धन्य रे धन्यु तुं, एम कहे श्रीहरी**
**नरसिंयो भक्त मुझ तोल जाणो**

**व्रज तणी नारी जे भाव शुं भोगवे**
**तेहेने प्रेम शुं स्हेजे माण्यो- ५**

( तिथे शरद पौर्णिमेचे दिवस आहेत. गरजाद (उच्च पातळीवरील सभ्यतापूर्ण) क्रीडेची वेणु वाजली. रुक्मिणी वगैरे राण्या, सर्वांत मिसळल्या. नरसिंहानी तिथे टाळया वाजवल्या (१) माझे, पुरुषाचे पुरुषपण लीन झाले. त्यां सर्वांमध्ये मी सखीरूपानें गाऊं लागलो. माझी देहदशा संपली, मी त्यांच्यामध्ये एकरूप झालो. मानिनीला खूष करणारी मी 'मध्यस्थी' होऊन गेलो (२) त्यांचे हाव आणि भाव निरनिराळया रसांची पखरण करूं लागले, आणि श्रीहरी तें सारें अनुभवून रसभरीत झाले. मोठ्या प्रेमानी त्यांनी आपला पितांबर देऊन टाकला. मी टाळया वाजवल्या म्हणून श्री कृष्णाचे मनोरंजन झाले. गोकुळांत अगदी पहिल्या कृष्णलीलेचे दर्शन झाले. अरुणोदय झाला आणि शंखनाद केला. रुक्मीणी आदि सर्व स्त्रीया तृप्त झाल्या. रुक्मीणीने गळयातला हार दिला- ४ धन्य रे धन्य तू असे श्रीकृष्ण म्हणाले. नरसिंह भक्त माझ्या तोलाचा, समजा गोकुळांतल्या नारीनी जे भाव आणि भोग, भोगले, ते त्यांनी सहजपणाने केवळ प्रेमाने अनुभवले) (प्रेमभक्तीने केवळ त्यांना ते अलभ्य लाभ झाले)

**जशोदा, तारा कनुडाने साद करीने वार रे**
**आवडी धूम मचावे व्रजमां नहि कोई पूछणहार रे- १**
**शींकु तोडयुं, गोरस ढोल्युं उघाडीने बार रे,**
**माखण खाधुं डोळी नाख्युं जान कीधु आवार रे- २**
**खां खां खाणा करतो हिंडे, बिहे नहि लगार रे**
**मही मथवानी गोळी फांडी आशां कहिये लाड रे- ३**
**वारे वारे कहुं छुं तमने, हवे न राखुं भार रे,**
**नित उठीने एम कयम सहिये वशी नयर मोझार रे- ४**
**माहरो कानजी घरमां हुंतो, क्यांहरो दीने बाहार रे**
**दहींदुधना माट भ-यां छे, बीजे चाखे न लगार रे- ५**
**शाने काजे मळीने आवी टोळी वळी दस बार रे ?**
**नरसिंया-यो स्वामी साचो, जुठी व्रजनी नार रे- ६**

(यशोदे, तुझ्या कन्हैयाला धाक दाखवून, त्याला आवर गोकुळांत इतकी दंगामस्ती करतो आहे आणि त्याला विचारणारा कोणी नाही. दरवाजा उघडून आत आला, शिंके तोडले, दूध सांडून दिले. लोणी खाल्ले आणि सांडले. जीव अगदी मेटाकुटीस आला ग. कानाकोपरा धुंडाळत हिंडतो. जराही भीत नाही. दही घुसळण्याचा गुंड (मटका) फोडुन टाकला, याला काय लाड म्हणायचे का. मी तुला वारंवार हे सांगत आहे. आता हा भार मला नको. रोज उठून हे

कां सहन करायचे ? सगळया गावांत हा माजोर झाला आहे.- (४) माझा कन्हैया घरांत होता. तुला तो बाहेर केव्हां दिसला ? दही दुधाचे माठ भरलेले आहेत ( माझ्या घरी) दुस-यांकडे तो थोडी चव सुध्दां घेत नाही. दहा बारा (गोपींची) टोळी बनवून,कशासाठी आली आहे ? नरसिंहाचा स्वामी सत्य आहे. खोटया आहेत गोकुळच्या नारी.)

**जयोदाजी जमवाने तेडे, नाचतां हरि आवे रे**
**बोले मीठडा बोलडिया ने अंगो अंग नचावे रे- १**
**मुखनी शोभा शी कहुं जाणे पूनमचंद्र बिराजे रे**
**नेत्र कमलना चाळा जोई जोई मन्मथ मनमां लाजे - २**
**अंजन बेउए नयने सारयां उर लटके गजमोती रे**
**तिलक तणी रेखा अति सुंदर माता हरखे जोती रे- ३**
**स्नेह जणाविने पुत्रने मार्यो, आविने कोडे वलम्यो रे**
**लाडकडो अति लाड करे छे क्षण ना मेहेलुं अणगो रे- ४**
**खोणे बेसाडीने भोजन करतो माता आनंद पामी रे**
**भक्त वच्छल भूधरजी भल्या महेता नरसैयानो स्वामी- ५**

(यशोदा जेवायला बोलवते,नाचत हरी येतो. गोड गोड बोल बोलतो आणि अंग अंगण नाचवतो. त्याचे मुखसौंदर्य काय सांगु. जसा पौर्णिमेचा चंद्र शोभतो आहे. कमळा सारखा त्याच्या दोन्ही डोळयांत अंजन घातले आहे. आणि छातीवर गजमोत्यांचा हार आहे. प्रेमाने आपल्या बाळाला चापट दिली आणि उराशी कवटाळले. लाडका मोठे लाड करतो आहे- क्षणभर पण त्याला वेगळे ठेवत नाही (यशोदा) . मांडीवर घेऊन त्याला भरवताना मातेला अत्यंत आनंद वाटत आहे. भक्तवत्सल कृष्णण नरसिंह महेताचा स्वामी,(नरसिंहाला) भेटला.)

**हळवे, हळवे, हळवे हरणी मारे मंदीर आव्या रे,**
**मोटे मोटे मोटे मे तो मोतीडे वधाव्या रे- १**
**कीधुं कीधुं कीधुं मुझने कांईक कामण कीधु रे**
**लीधुं लीधु, लीधु माऊ चितडुं चोरी लीधुं रे- २**
**जागी जागी जागी हुं तो हरिमुख जो वा जागी रे,**
**भागी भागी भागी मारा भवनी भावट भागीरे - ३**
**फुली फुली फुली हुं तो हरिमुख जोइने फुली रे**
**भूली भूली भूली मारा घरनो धंधो भूली रे- ४**
**पामी पामी पामी हुं तो महा पदवी पामी रे**
**मळीयो मळियो, मळीयों महेता नरसैया-यो स्वामी रे- ५**

(सावकाश, सावकाश, सावकाश, हरी माझ्या घरी आले. मोठ्या, मोठ्या, मोठ्या भावनोत्कटतेने मी त्यांचे स्वागत केले. केले,केले,केले,याने माझ्यावर कांहीतरी वशीकरण केले घेतले,घेतले,घेतले यानी माझे मन चोरून घेतले (झेपेतुन) जागी झाले,जागी झाले,जागी झाले, हरिचें मुखदर्शन करायला मी जागी झाले. (अज्ञानांतुन मी उठले) पळाली, पळाली, पळाली माझी संसाराची उपाधी पळाली. (आनंदाने) फुलले,फुलले,फुलले मी हरीमुख पाहुन फुलले. विसरले,विसरले,विसरले मी घरचे व्यवहार विसरले. मिळाली मिळाली,मिळाली मला मोठी पदवी मिळाली. भेटला, भेटला, भेटला नरसिंह महेताचा स्वामी भेटला)

**सांभळ शाहयर सुरता घरीने आज अनोपम मीठो रे**

(ऐक सखी,प्रेममय होऊन आज आनुपम गोड (कृष्ण आला आहे)

**जे दीठो ते जोवा सरखो अमृत- पे अति मीठो रे- १**
**दृष्टे ने आवे, नियम जगावे वाणी- रहित विचारो रे**
**सत्य अनंत ज जेहेने कहिये ते नवधायी न्यारो रे- २**
**नवधामां तो नहि नखेडो दशधामां देखाशे रे**
**अचव्यो रस छे एहेनी पासे ते प्रेमी जनने पाशेरे- ३**
**अद्वैत ब्रम्ह- अनोपम लीला असंख जुगनो एहेवो रे**
**जोग - जगन- जपतप मुनी दुलभ, माने तेहेवो मेवो रे- ४**
**ज्यो- लगी, ज्यम छे, त्यमनो त्यम छे वधे घटे नही वहालो रे**
**आवे न जायें, जाय न आवे, नही भरयो नही ठाले रे- ५**
**पूर्णानंद पोते पुरषोत्तम, परम गत छे एहेनी रे**
**ए पद क्षर - अक्षरनी पर तमे ज्यो ज्यो चितमां चेती रे- ६**
**हुं- तुं मटशे, दुग्धा टळशे, निरभे थाशो निखी रे**
**भले मळयो नरसिंयो-या स्वामी, हुं हैडांना हरखी रे - ७**

(जो दिसला तो पहाण्यासारखा- अमृतापेक्षांही अत्यंत गोड आहे. प्रत्यक्ष नजरेला दिसत नाही,परंतु वाणी शिवाय (आंतल्या गंभीरतेने) विचार करतां करतां मुक्तीची इच्छा उत्पन्न करतो. सत्य,अनंत,असे ज्याला म्हणतात तो नवधा भक्ती पेक्षां वेगळी आहे (नवधा भंक्तीने मिळणारा नाही) नवधा भक्तीने ज्याचा निवाड (शोध) होत नाही. तो दहाव्या भक्तीत दिसतो. न चाखलेला रस या दहाव्या भक्तीमधे आहे. प्रेमी जनानांच त्याचा रसास्वाद तो (कृष्ण) देतो. उद्वैत ब्रम्हाची अनुपम लीला, असंख्य युगें अशीच चालू आहे. योग,जग,जप,तप;मुनी यांना दुर्लभ मानावा तसा दिसतो.

जिथे आहे,जसा आहे,तसाच्या तसा आहे हा प्रिय वाढत नाही,कमी होत नाही,येत नाही,

जात नाही जात नाही, येत नाही, भरत नाही, रिकामा होत नाही. स्वतः पूर्णानंद पुरुषोत्तम आहे. हा परमपद आहे क्षर- अक्षराच्या पलिकडे याचे स्थान (पद) आहे, अन्ये जो जो तुम्ही मनात विचार कराल, तों तों, तुम्हाला समजेल. मी- तू पण नाहिसे होईल. जंजाळ टळेल यांचें दर्शन घेऊन तुं निर्भय होशील नरसिंहांचे स्वामी (श्रीकृष्ण) भेटल्यामुळे फार छान झाले. मी मनांत फार अनंदून गेले)

**१) पारकी हुंशे महत्ता करे प्राणियां, पुण्य पाखी सर्व वात खोटी**
**के तो तो कर्षण करी कोदरां वावियां, क्यांथी जमे तुं दालरोटी ?**
**२) कें तो दान करी आप्युं अजा तणुं, क्यांथी दूहे तुं तो घेर झाटो**
**कें तो क्याथिर सोनारने आपिषुं क्यां थी पेहेरे तु तो कन कटोटी ?**
**३) उपुण्यथी रिध्दि, पुणथी सिध्दी छे, पुण्यथी पेहेरशो ढगलो डोटी**
**भणे नरसैं यो तु पुण्य कर प्राणिया पुण्यथी पामशे पदवी मोटी**

(परक्यांच्या आशेने (परकी भरवशाचा) मोठेपणा दाखवतोस मानवा, पुण्याशिवाय सर्व खोटे आहे. शेती करून तुं तर कोदरा (तांदुळाची एक जात) पेरलास- आतां डाळ आणि पोळी तू खाणार कुठुन ? केव्हांतरी तुं बकरीचें दान केलेस आतां घर झाडून तु (दूध) दुहणार कुढून ? तुं तर सोनाराला कथील दिलेस, आता तुं सोन्याचे पदक, घालणार कुठून ? रिध्दि, सिध्दी पुण्याने प्राप्त होतात. पुण्याने धोतर अंगरखा घालशील. नरसिंह म्हणतात, हे प्राण्या, पुण्य कर. पुण्यानेच मोठया पदवीला प्राप्त करशील)

**बाला रे वरनी पालखी, जोतां वनितानें थाय उलासं**
**नाही धोईने पोढिया रे, तिलक कीधां भाल**
**वरना जानैया शोभी रहयो रे माथे नाख्यां छे अबीर गुलाल- १**
**लीला ते वांसणी पालखीरे तेहेना उचयकनारा चार**
**माथे ते बांध्या पोतियां रे, मोढे, राम- नाम पोकार- २**
**चोरी ते बांधी चोकमां रे, छाणां ते लाव्या सगाया**
**गोलपापडी देखे कुतरारे ते तो मनमां घणुं मलकाय- ३**
**बालावरने आगल चाले लाकडां रे पाछड चाले लाहया,**
**जमाई तो चाल्या सासरे, एहेना सासुने हरख न माय- ४**
**तोरणे तनखां उडीयां रे, मांडवे लागी लार**
**उढ रे सासु शंखणी रे, तारो जमाई आव्यो बहार- ५**
**पंधरसे पेहरामणी रे, मराणुं नामनुं गाम**
**लालबाईनी दीकरी रे, चिता कुंवरी एनु नाम- ६**

**जमाई तो रहया सासरें, जानैया आव्या घेर**
**टको पैसो सर्वे खाई गया रे, विवाह कीधो छे रुडी पेर-७**
**बार घडा, बार कोडियो रे उपर पैसो मेहेलो रोक**
**जैने कोहो एहेना बापने रे, हवे ताणीने मेंहेलो पोक- ८**
**जीवन जमडा लेडू गया रे, देहीनो कीधो ए हाल**
**नरसियोनो स्वामी मल्यो रे, ते तो उतरिया भवपार- ९**

(बालीकेच्या पतीची पालखी पाहून वनितेला (मृत्यु- देवता) आनंद वाटला. स्वच्छ आंघोळ घालून त्याला झोपवला आणि कपाळावर टिळा लावला. वराकडची व-हाडी माणसें सूंदर दिसत आहेत, त्यानी डोक्याला अबीर गुलाल लावला आहे. हिरव्या बांबुची पालखी आहे आणि तिला चौघांनी उचलली आहे. डोक्याला रुमाल बांधले आहेत, मुखाने राम नाम उच्चारीत आहेत. चौकांत मंडप घातला आहे. जाळण्यासाठी गोव-या आणल्या आहेत. गोल पापडया पाहून कुत्र्यांच्या तोंडाला पाणी सुटले आहे. नव-या मुलापुढे लाकडें चालली आहेत, पाठीकडून निखारे चालले आहेत. जावयी सासरी चालला आहे, याच्या सासुचा आनंद पोटांत मावेनासा झाला आहे. मांडवाच्या तोरणाशी ठिणग्या उडत आहेत, आणि मांडवांत लांब रांग लागली आहे (माणसांची) अग शंखिणी सासू उठ, तुझा जावयी बाहेर आला आहे. अरे, स्मशान नामाच्या गावांत, पंधरा लोकांना पोषाख घालायचे आहेत. लालबाईची (अग्नी) मुलगी आहे. तिचें नाव 'चिता' कुंवरी आहे. अरे, जावयी सासरी राहिला- त्याचें व-हाड घरी आलें. पैसे टक्के सगळे खाऊन गेले. विवाह उत्तम त-हेने केला. बारा घडे, बारा पणत्या आणि त्यांच्यावर रोख पैसे ठेवले रे, जाऊन सांगा त्याच्या बापाला, आतां भरपूर रडुन घे. यमदूत जीवन घेऊन गेले, आणि शरीराची ही परिस्थिती केली, नरसिंहाचे स्वामी भेटले आणि नरसिंह संसार तरून गेले.)

**घडपण केणे मोकल्युं, जाण्युं जोबन रेहे सहु काल**
**उमरा तो डुंगरा थया रे, पादर थयां परदेश**
**गोळी तो गंगा थई रे, अंगे उजळा थया छे कोश- १**
**नोहातुं जोइतुं ने शीद आवियुं रे, नोहोती जोई तारी वाट**
**घरमांथी हळवा थया रे, एहेनी खुणे ढळावो रे खाट- २**
**लहानपणे भावे लाडवा रे, घडपणे भावे सेव**
**रोज ने रोज जोइए राबडी रे, एवी बळी रे घडपणनी टेव - ३**
**प्रातःकाळे प्राण महारे रे, अग्नविणा अकळाय**
**घरना केहे मरतो नथीरे 'तुने बेसी रेहेतो शुं थाय ?' - ४**

**दीकरा तो जुजवा थया रे, वहुओ दे छे गाळ**
**दीकरीओने जमाई लेई गया, हवे घडपणना शारे हाल ? - ५**
**नव नाडो जुजवी पडी ने आवी पोंहोचो काळ**
**बैरा छोकरो फटफट करे रे, नहाना बाळक दे छे गाळ - ६**
**अंतकाळे वळी आनिया रे दीकरा पथारिया द्वार**
**पांसळीएथी वासळी रे पछे छोडिने आपी बाहार - ७**
**एहेवुं सांभळी प्रभु भजो रे, संभारजो जुगवास**
**पर - उपकार कीधे पामशो रे, गुण गाय नरसीयो दास - ८**

(सदा सर्वकाळ यौवन राहील, असे वाटत होते- हे म्हातारपण कुणी पाठवले. उंबरठा (आता) डोंगर वाटतो आहे. गावदरीचें मैदान परदेशासारखें झाले आहे (१) पाण्याचा गुंड, 'गंगा नदी' झाला आहे आणि अंगावरचे केस सफेद झाले आहेत. नको होते, आणि हे कुठून आले रे, तुझी वाट पाहिली नव्हती. घरांत अप्रतिष्ठा व्हायला लागली. याची खाट, कोप-यांत हलवा (असे घरांत बोलुं लागले) (२) लहान पणी लाडू आवडतात, म्हातारपणीं शेव आवडते. रोज रोज राबडी हवी असते, अशी म्हातारपणची जबरदस्त सवय आहे (३) पहाटे माझा प्राण अन्ना शिवाय व्याकुळ होतो आहे, आणि घरची माणसे म्हणतात 'हा मरत नाही तुला (गप्प) बसायला काय होते आहे ?' (४) (काय हरकत आहे) मुलगे वेगळे झाले, सुना शिव्या देतात. मुलींना जावयी घेऊन्न गेले, आतां म्हातारपणी काय स्थिती होणार ? (५) नऊ नाडया सुटत चालल्या, अंतकाळ येऊन्न पोचला. बायका मुलें तिरस्कार करताहेत. आणि बालके शिव्या देताहेत. अंतकाळी, मुलगा येऊन्न दारांत हजर झाला (६) फासळयां असणारें हे शरीर बांबुंवर (तिरडीवर) आणि नंतर ते बाहेर सोडून देतात (जाळून, पुरुन नष्ट करतात) (७) हे ऐकून (तरी) ईश्वराचें भजन करा. युगाचे आपले अस्तित्व स्मरण करा. दुस-यांवर उपकार करून तुम्हाला मिळेल. नरसिंह, (ईश्वराचा) दास गुण गातो (ईश्वराचे).

**जुवानीने दाहाडे रे हरिने जाण्या नही रे**
**मोहयुं परदारा साथे मन,**
**कांईक तो मोहयो रे कामिनीनां कल्पमोरे**
**कोईं एक जोडवा धायो वन- १**
**पचीस ने पचास रे परपंचमो गयो रे**
**दोहिला आव्या साठ वरसना दंन**
**सित्तेरने सूधी रे कोई समझयो नहीं रे**
**पछे चाल्यो साधन करवा मन; २**

**आखंडिये न सुझे रे गळे बहु नासिका रे**
**बोले ते तो संभळाय नहि करण**
**माया तो न मुके रे, तूटे नहि तृष्णा रे**
**ओळखाया नहि अशरण शरण- ३**
**हाथमां लाकडी रे, चरण चाले नहि रे**
**तूटीने शिथील थयुं रे अंग**
**मुख मोहे दंत रे एके दिसे नही रे**
**तोय पापियुं उदर मागे अन्न- ४**
**भाग्य जेहेनुं भलुं रे, आ अवसर ने ओळख्यो रे**
**ते तो प्राणी केहेवाय हरिना जन**
**नरसैंयाना स्वामीने रे सुखमां संभारजो रे**
**जो होय पेला भवनु पुन्य- ५**

(तारुण्याच्या दिवसांत हरीला ओळखले नाही. परस्त्रीचा मनाला मोह पडला. कामिनीच्या सहवासांत काहींजन मोहून गेले. कांही वानप्रस्थाच्या मागे धावले. पंचवीस आणि पन्नास तर प्रपंचात गेले,साठीच्या घरांत तर नातवंडे झाली. सत्तरी पर्यंत तर कांही समजलेंच नाही, नंतर चालला साधन करायला मनाने.(२) डोळयांनी पहाणे होत नाही,नाक फार गळतें आहे. कोणी बोलले तर कानाना ऐकायला येत नही. तरीपण माया सुटत नाही, आसक्ती तुटत नाही. निराधाराचा आधार ओळखला नाही (३) हातांत काठी आहे. पाय चालुं शकत नाहीत,अंग अंग शिथील झाले आहे. तोंडात एक दात दिसत नाही,तरीही पापी पोट अन्न मागत आहे. (४) ज्याने हा जीवनातला प्रसंग ओळखला त्याचे नशिब उत्तम आहे आणि तोच ईश्वराचा लाडका आहे. मागच्या जन्माचे पुण्य असेल तोच नरसिंहाच्या स्वामीला,सुखाच्या परिस्थितीत स्मरत राहील (५)